# <u>प्राचीन महाराष्ट्र :</u>

- कौटिल्याच्या अर्थशास्त्र या ग्रंथामध्ये अश्मक व अपरांत येथील पावसाच्या प्रमाणाचा उल्लेख आहे.
- इ. स. पू. तिस-या शतकात सम्राट अशोकाच्या काळात महारठठ प्रदेशात धर्मोपदेशकांना बौध्द धर्माचा प्रसार करण्यासाठी पाठवल्याचा उल्लेख शिलालेखातून प्राप्त होतो.
- इस़पू. दुस-या शतकातील सातवाहनांच्या नाणेघाटातील लेखात महारठठ असा उल्लेख आढळतो.
- इ.स.पू. 365 च्या मध्य प्रदेशातील फेरण स्तंभलेखात राजा श्रीधरवर्माचा सेनापती सत्यनाग हा स्वत:ला महाराष्ट्रवादी म्हणवतो.
- चालुक्य राजा दुसरा पुलकेशी याच्या ऐहोळ प्रशस्तीमध्ये रविकिर्ती याने महाराष्ट्राचा उल्लेख केल्याचे आढळते.

## <u>सातवाहन कालखंड ( इ.स.पू. 230 ते इ.स.230 )</u>

- सातवाहनांच्या 30 राजांनी एकूण 460 वर्षे महाराष्ट्रावर राज्य केले. जागतिक नकाशावर महाराष्ट्राला सर्वप्रथम दर्शवणारे व महत्त्व प्राप्त करुन देणारे सातवाहन हेच पहिले महाराष्ट्रातील राजघराणे होय.
- उपलब्ध ऐतिहासिक साधनांवरुन सातवाहनांचे मूळ स्थान महाराष्ट्र असून **पैठण (प्रतिष्ठाण) ही त्यांची राजधानी होय.**
- कोल्हापूर, पैठण, क-हाड, नाशिक, भोकरदन येथील पुरातत्वीय उत्खनांवरुन सातवाहनांचा इतिहास उलगडतो. कार्ले, भाजे, बेडसे, पितळखोरे, अजंठा, कान्हेरी येथील लेणी, चैत्य, विहार व शिलालेख , **गुणाढयाची बृहत्कथा**, **राजा हाल याचा गाथा सप्तशती** इ. साहित्यातून व परकीय प्रवाशांच्या प्रवासवर्णनावरुन सातवाहनांची माहिती मिळते.

## सातवाहन राजवंशातील प्रमुख राजे :

- **सिमुक** : सातवाहन राजवंशाचा संस्थापक. दक्षिणपथपती असे बिरुद.
- सिमुक_नंतर त्याचा भाऊ कृष्ण गादीवर . 18 वर्षे.
- सातकर्णी प्रथम : सिमुकचा मुलगा.
- राजा हाल : गाथा सप्तशती हा काव्य संग्रह.
- गौतमीपुत्र सातकर्णी : त्रिसमुद्रतोय पितवाहन. नावापुढे आईचा उल्लेख.
- **यज्ञश्री सातकर्णी : शेवटचा राजा.**
- शकांची आक्रमणे, सततची युध्दे, दुर्बल वारसदार, विशाल साम्राज्य यामुळे सातवाहन सत्तेचा नाश.
- सातवाहन राजे वैदिक धर्माचे अनुयायी आणि पुरस्कर्ते होते.
- स्तूपाची निर्मिती.अजंठा, कार्ले, भाजे, नाशिक लेणी.
- भित्तीचित्रे : अजंठा, वेरुळ, कार्ले, जुन्नर, पितळखोरा

## वाकाटक घराणे :

- सातवाहन साम्राज्याच्या अस्तानंतर वाकाटक चा उदय.
- राजकीय परिस्थिती : **विंध्यशक्ती वाकाटक घराण्याचा संस्थापक.**

  विध्यशक्ती चा पुत्र प्रवरसेन : सर्वात बलशाली राजा.

  प्रवरसेन च्या मृत्यूनंतर त्याच्या साम्राज्याची विभागणी गौतमीपुत्र व सर्वसेन या पुत्रांमध्ये झाली. **ज्येष्ठ शाखा आणि वत्सगुल्म शाखा**
- कवी कालीदासाचे अनेक वर्षे वाकाटकाकडे वास्तव्य. येथेच कालीदासाने मेघदूत रचले.

## बदामीचे चालुक्य :

- वाकाटकानंतर चालुक्य घराण्याची सत्ता महाराष्ट्रात.
- **पहिला राजा जयसिंह**.त्यानंतर पहिला पुलकेशी, कीर्तीवर्मन, मंगलेश, दुसरा पुलकेशी
- **दुसरा पुलकेशी हा सर्वात पराक्रमी राजा.** हर्षवर्धन याचा पराभव.
- पल्लव राजा नरेंद्रसिंह वर्मन याने पुलकेशीला ठार केले. त्यानंतर पहिला विक्रमादित्य, विनयादित्य, विजयादित्य दुसरा व कीर्तीवर्मन दुसरा हे राजे. **कीर्तीवर्मन दुसरा हा शेवटचा राजा.** राष्ट्रकूट राजा कृष्ण प्रथम याने याचा पराभव करुन ही सत्ता संपुष्टात आणली.

**चालुक्यांचे योगदान :**

- कवी बिल्हन चे विक्रमांकदेवचरित, विज्ञानेश्वराचे, मिताक्षरा, पंपाचे पंपरामायण, सोमेश्वराचे मानसोल्लास अशा ग्रंथांची निर्मिती.
- बदामी, हंपी, ऐहोळ, पटटदकल्ल, श्रवणबेळगोळ येथील मंदीरे यांच्या स्थापत्याची प्रगती दर्शवतात.
- ही सर्व मंदीरे दविड शैलीची आहेत.
- चालुक्य हे वैष्णव पंथी होते.

## राष्ट्रकूट घराणे :

- चालुक्यांच्या पतनानंतर इ. स. 753 च्या सुमारास राष्ट्रकूट राजे महाराष्ट्रावर सत्तारुढ. प्रारंभी हे चालुक्यांचे सामंत होते. राष्ट्रकुटांची **नंदिवर्धन (अचलपूर)**, सातारा जिल्हयातील माण, व मराठवाडयातील लातूर येथे सत्ताकेंद्र निर्माण झाली.
- **दंतीदुर्ग हा या घराण्याचा संस्थापक राजा.** त्यानंतर त्याचा चुलता कृष्ण प्रथम हा गादीवर.

- **कृष्ण प्रथम या राजाने जगप्रसिध्द वेरुळ येथील कैलास मंदिर बांधले.**
- राष्ट्रकुट राजे जैन धर्माचे अनुयायी.

## शिलाहार घराणे :

- इ. स. 765 मध्ये राष्ट्रकुट राजा कृष्ण प्रथम याने चांदोर(चंद्रपूर) चा भाग जिंकून या ठिकाणी शिलाहारांना सामंत म्हणून नेमले.
- **शिलाहारांनी गोमंतक येथील वलीपटटणम येथे आपली राजधानी वसवली.**
- शिलाहारांची महाराष्ट्रात दक्षिण कोकण, उत्तर कोकण आणि कोल्हापूर या तीन ठिकाणी सत्ता केंद्रे निर्माण झाली.
- दक्षिण कोकणचे शिलाहार : या घराण्याचा मूळ संस्थापक **विदयाधर जीमुतवाहन.** उस्मानाबाद जिल्हयातील तगर हे याचे मूळ स्थान. सोनेरी गरुड पक्ष्याचे चिन्ह
- उत्तर कोकणचे शिलाहार : **कपर्दी** हा या घराण्याचा मूळ पुरुष.
- कोल्हापूर चे शिलाहार : **जतीग** हा या घराण्याचा मूळ पुरुष.दुसरा भोज हा प्रसिध्द राजा. यानेच कोल्हापूर परिसरातील 15 किल्ले बांधले असल्याचा उल्लेख अंबाबाई मंदीरातील शिलालेखावरुन समजते.
- शिलाहार राजे जैन धर्माचे अनुयायी.

## गोंड घराणे :

- प्राचीन महाराष्ट्रात शेवटच्या काळात हूण व मुस्लीम आक्रमणांमुळे महाराष्ट्रामध्ये राजकीय अस्थिरता निर्माण झाली. यावेळी महाराष्ट्रात यादवांनी देवगिरी येथे आपली सत्ता प्रस्थापित केली. याच काळात चंद्रपूर येथे गोंड घराण्याने आपली सत्ता प्रस्थापित केली.
- कोल भील हा या घराण्याचा संस्थापक.

# मध्ययुगीन महाराष्ट्र

## यादव कालखंड :

- महाराष्ट्राच्या इतिहासात यादव काळाला अनन्यसाधारण महत्व.
- कल्याणीच्या चालुक्याच्या पाडावानंतर दक्षिणेत तीन प्रबळ सत्तांचा उदय. **कर्नाटकात होयसळ सत्ता, आंध्रात काकतीय सत्ता आणि महाराष्ट्रात यादव सत्ता.**
- सुबाहू चा पुत्र **दृढप्रहर हा यादवांच्या देवगिरीच्या राजांच्या वंशावळीतील मूळ पुरुष होय.**
- सिंघण द्वितीय हा पराक्रमी राजा. त्याने मायणी येथे संगमेश्वराचे व शिखर शिंगणापूर येथे महादेवाचे मंदीर बांधले.
- सिंघणानंतर कृष्णदेव याने आपल्या राज्याचा विस्तार करण्यासाठी माळव्याच्या परमाराचा पराभव केला. त्यानंतर सत्तेवर आला महादेव यादव.त्यानंतर रामचंद्र यादव गादीवर आला .त्याने देवगिरीला वैभवाच्या शिखरावर नेले.देवगिरीचे वैभव ऐकून अल्लाउददीन खिलजी याने 1296 मध्ये देवगिरीवर स्वारी केली. देवगिरीवर इस्लामची सत्ता प्रस्थापित. संपत्ती व खंडणी घेऊन खिलजी माघारी फिरला. रामचंद्र यादवाने खंडणी देण्याचे बंद केल्यानंतर मलिक काफुर ने देवगिरीवर आक्रमण केले. रामचंद्र कैद.
- **शंकरदेव ऊर्फ सिंघण तृतीय हा यादव घराण्यातील शेवटचा सम्राट**. मलिक काफूर ने 1312 मध्ये शंकरदेवाचा पराभव केला. व देवगिरी हे दक्षिणेकडील मुस्लीम सत्तेचे पहिले केंद्र बनवले.
- खिलजी घराण्यानंतर देवगिरीवर तुघलक घराण्याची सत्ता. महंमद बिन तुघलकाने 1327 मध्ये आपली राजधानी दिल्लीवरुन देवगिरीस आणली. देवगिरीस दौलताबाद असे नाव.

## बहामणी राज्य : ( 1347 ते 1494)

महाराष्ट्रावर तेराव्या शतकाच्या अखेरपासून सुरु झालेली दिल्लीच्या सुलतानांची आक्रमणे व त्यानंतर झालेली बहामणी राज्याची स्थापना या महत्वाच्या घटना आहेत.

महाराष्ट्रात बहामणी राज्याची स्थापना हसन गंगू बहामणी याने केली. तो या राज्याचा मूळ संस्थापक. महंमद गवाण हा मुत्सददी सरदार . त्याच्या मृत्यूनंतर बहामणी राज्याचे पाच तुकडे :

**1) व-हाड : इमादशाही**

**2) अहमदनगर : निजामशाही.**

**3) बिदर : बारीदशाही**

**4) गोवळकोंडा : कुतूबशाही**

**5) विजापूर : आदिलशाही.**

## मुघल कालखंड :

- दक्षिण भारतातील विशेषत: महाराष्ट्रातील खानदेश व अहमदनगर ही स्वतंत्र राज्ये आपल्या अधिपत्याखाली आणण्याची अकबराची महत्वाकांक्षा.
- खानदेशने अकबराचे सार्वभौमत्व स्वीकारले.
- मात्र चांदबिबीने अकबराचा आदेश धुडकावला.शेवटी तह.
- जहांगीर व शहाजहान यांनीही अहमदनगरवर स्वारी केली. मलिक अंबर हा निजामशाहीचा कारभार पाहत होता.त्याने मुघलांबरोबर तह केला. पुढे शहाजी राजे भोसले यांनी शहाजहान विरुध्द युध्द पुकारले.
- मात्र 1636 मध्ये शहाजीराजांचा पराभव.निजामशाहीचा शेवट.
- त्यानंतर औरगजेबाने छत्रपती शिवाजीमहाराज यांच्या काळात दख्खन विजयाचे स्वप्न पाहिले.मात्र त्यात त्याला यश आले नाही.

# मराठा कालखंड ( 1630 ते 1818)




Nagesh Gaikwad

# 19 व्या शतकातील प्रबोधन :

## महाराष्ट्रातील धार्मिक जीवन :

- 19 व्या शतकात महाराष्ट्रातील समाजजीवनात धर्माला फार महत्वाचे स्थान.
- समाजजीवनावर धर्मसंस्थेचा पगडा .
- हिंदू धर्मात कर्मकांड, व्रतवैकल्ये, दानदर्म, अनुष्ठाने इ.चे महत्व.
- आळशी पुरोहित वर्ग
- अंधश्रध्दा व रुढी परंपरांना जास्त महत्व.
- धर्मात बेबंदशाहीची निर्मिती.

## महाराष्ट्रातील समाजजीवन :

- वर्णव्यवस्था, जातिव्यवस्था, श्रेष्ठ-कनिष्ठ, स्पृश्य-अस्पृश्य इ. बाबतीत कडक निर्बंध.
- समाज अनेक जाती-उपजातींमध्ये विभागला गेलेला.
- पुरुषप्रधान समाजव्यवस्था. स्त्रियांची स्थिती हालाखीची.
- स्त्रियांना शिक्षणाचा अधिकार नव्हता.
- सती,बालविवाह, विधवाविवाह बंदी, केशवपन, बहुपत्नीकत्व, देवदासी या प्रथा.

19 व्या शतकाच्या प्रारंभी महाराष्ट्रात ब्रिटीशांची सत्ता स्थापन झाली.
इंग्रजांच्या राजवटीमुळे महाराष्ट्रात सर्वच क्षेत्रात प्रबोधनाची चळवळ सुरु.

**प्रबोधन :**

समाजात प्रचलित असलेल्या आचार-विचार व व्यवहारात जेव्हा जेव्हा दोष उत्पन्न होतात, तेव्हा समाजाला पुन्हा बुध्दिनिष्ठ व विज्ञाननिष्ठ पध्दतीने जागृत करण्याच्या प्रक्रियेला प्रबोधन म्हणतात.

## महाराष्ट्रातील प्रबोधन चळवळीची कारणे :

**1)पाश्चात्त्य संस्कृतीचा प्रभाव :**

बुध्दीप्रामाण्यवाद, राष्ट्रवाद, औदयोगिकीकरण, उदारमतवाद, व्यक्ती स्वातंत्र्य व समता या संकल्पनांची महाराष्ट्रीय जनतेस ओळख. नवशिक्षितांमध्ये जाणीव जागृती.

**2) पाश्चात्त्य शिक्षणाचा प्रभाव :**

खिस्ती धर्माचा प्रसार करण्यासाठी आणि कारकून तयार करण्यासाठी इंग्रजी शिक्षण सुरु.

शिक्षण सर्व जातीधर्मांना, स्त्रियांना खुले केले.

आपल्या समाजातील खुळचट कल्पना, चालीरीती, रुढी व परंपरा इ. आपल्या अधोगतीची कारणे आहेत हे समजले. यातून महाराष्ट्रात धार्मिक व सामाजिक सुधारणा चळवळी सुरु.

**3) खिस्ती मिशनरींचे कार्य :**

समाजव्यवस्था व परंपरागत धर्म यांतील दोष दाखविण्याचे काम.

समाजातील अनिष्ट चालीरीती, रुढी व परंपरा यावर कडाडून टीका.

महाराष्ट्रातील धर्मसुधारणा चळवळीस व प्रबोधनास चालना.

**4) वैज्ञानिक व भौतिक सुधारणा :**

इंग्रजांनी वैज्ञानिक दृष्टीकोन व भौतिक सुधारणा यांचा अवलंब केला.

आपल्या मागासलेपणाची जाणीव येथील तरुणांना.

**5) धर्म व विचारप्रसाराची साधने :**

मुद्रण कलेचा शोध. भारतीय भाषांमध्ये बायबलचे भाषांतर . छापील ग्रंथ.

वृत्तपत्राांमधून जांभेकर, तर्खडकर बंधू, लोकहितवादी यांचे प्रबोधनात्मक लेखन.

**6) धार्मिक व समाजसुधारणा चळवळी :**

सजाजसुधारकांकडून सुधारणा चळवळी.

# महाराष्ट्रातील समाजसुधारक :

## १) जगन्नाथ शंकरशेठ (१८०३-१८६५) :-



१० फेब्रु. १८०३ रोजी जन्म. ठाणे जिल्ह्यातील मुरबाड हे मूळगाव. मुरकुटे हे त्यांचे उपनाम. लहानपणी वडिलांचा मृत्यू. संपत्तीचा उपयोग जनतेच्या कल्याणासाठी केला.

***शैक्षणिक कार्य :-***

- विद्यादानाखेरीज आमचा उद्धार होणार नाही असे एल्फिन्स्टनला स्पष्टपणे सांगितले.
- १८२२ साली बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी ही संस्था स्थापन. या देशात शिक्षणाचा प्रसार व्हावा यासाठी स्थापन झालेली ही पहिलीच संस्था. मुंबई व मुंबईबाहेर अनेक शाळा सुरु केल्या. बाळशास्त्री जांभेकर, सदाशिवराव छत्रे यांचे फार मोठे सहकार्य.
- एल्फिन्स्टन च्या स्मारकासाठी जमवलेल्या फंडातून एल्फिन्स्टन कॉलेज सुरु केले.
- सरकारकडुन बोर्ड ऑफ एज्युकेशन वर नानांची नियुक्ती. याच बोर्डाचे १८५६ साली विद्याखात्यात रुपांतर.
- १८४५ साली दादाभाई नौरोजी, डॉ. भाऊ दाजी लाड यांनी स्थापन केलेल्या स्टुडंट लिटररी ॲण्ड सायंटिफिक सोसायटी ची मुंबईत स्थापना केली. त्यास नानांनी सर्वतोपरी सहकार्य केले.
- स्वतःच्या जागेत जगन्नाथ शंकरशेठ मुलींची शाळा काढली.
- ग्रँट मेडिकल कॉलेजची स्थापना करण्यात सहभाग.
- मुंबई विद्यापीठाचे पहिले फेलो.
- जे जे स्कूल ऑफ आर्ट च्या स्थापनेमागे नानांचे प्रयत्न.

***सामाजिक कार्य :-***

- १८४६ साली म्युनिसिपल ॲक्ट संमत होण्यामागे नानांचे प्रयत्न.
- ॲग्री हॉर्टिकल्चर सोसायटी व जिऑग्राफिकल सोसायटीच्या स्थापनेत नानांचा सिंहाचा वाटा.
- मुंबई ते ठाणे ही रैल्वे सुरु होण्यामागे नानांचे प्रयत्न.

***राजकीय कार्य :-***

- १८५२ साली दादाभाई नौरोजी यांच्यासह बॉम्बे असोशिएशन ही संस्था मुंबईत स्थापन केली.
- १८३५ मध्ये जस्टीस ऑफ पीस  या पदावर नियुक्ती.

**योग्यता :**

**आचार्य जावडेकर :** लोकांच्या वतीने सरकारशी बोलणारे व मध्यस्थी करणारे मुंबईतील पहिले पुढारी

**आचार्य अत्रे :** मुंबईचा अनभिषिक्त सम्राट.

## २) आचार्य बाळशास्त्री जांभेकर (१८१२-१८४६) :-



- आधुनिक महाराष्ट्रातील पहिले समाजसुधारक, मराठी वृत्तपत्राचे जनक, इतिहास संशोधक आणि विचारवंत.
- जन्म: पोंबुर्ले या खेडयात रत्नागिरी जिल्ह्यात ६   १८१२ साली.  शाळेत विद्यार्थी म्हणून शिकत असतानाच गणिताचे शिक्षक झाले. संस्कृत, इंग्रजी, मराठी, गणित, भूगोल, गुजराती, बंगाली, फारशी या भाषांचे ज्ञान.

***शैक्षणिक कार्य :-***

- बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीचे डेप्युटी  सेक्रेटरी.

- एल्फिन्स्टन कॉलेजात प्राध्यापक व सरकारच्या शिक्षण खात्यात काम केले.
- गणित व विज्ञानावर आधारित शून्यलब्धी हे पुस्तक मराठीत लिहिले.

***<u>वृत्तपत्रे व वाङ्मयीन क्षेत्रातील कार्य :-</u>***

- १८३२ साली दर्पण हे मराठी भाषेतील पहिले साप्ताहिक सुरु केले. इंग्रजी व मराठी भाषेत ते निघत असे.
- १८४० मध्ये दिग्दर्शन नावाचे मराठी मासिक सुरु. विज्ञानाचा प्रसार करणे हा उद्देश.
- भारतीय ताम्रपट व शिलालेख यांचे संशोधन व वाचन करुन अनेक निबंध लिहिले. त्यामुळे त्यांना आद्य इतिहासकार असे संबोंधले जाते.
- बाल व्याकरण, नीतिकथा, सार संग्रह, हिंदुस्थानचा इतिहास, संध्येचे भाषांतर, इंग्लंडचा इतिहास, हिंदुस्थानातील इंग्रजी राज्याचा इतिहास, हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास इ. ग्रंथ

***<u>सामाजिक कार्य :-</u>***

- हिंदू धर्मातून परधर्मात गेलेल्यांना परत शुद्ध करुन स्वधर्मात घ्यावे असे स्पष्ट विचार. त्यातूनच शेषाद्री प्रकरण घडले.

**<u>योग्यता :-</u>**

आद्यसुधारक, मराठी वृत्तपत्राचे जनक, आद्य इतिहास संशोधक, सुधारणावाद्यांचे प्रवर्तक, व्यासंगी पंडित

**<u>हर्डीकर :</u>** निरपेक्षपणे संपूर्ण आयुष्यभर सर्व प्रकारची झीज सोसून लोकशिक्षण, वाङ्मय व इतिहास यांची एकनिष्ठेने सेवा करणारा असा त्यागी कार्यकर्ता फार विरळा.

## <u>३) दादोबा पांडूरंग तर्खडकर (१८१४-१८८२) :-</u>

- महाराष्ट्राचे पहिले धर्मसुधारक, व्याकरण व भाष्यकार, स्वतंत्र प्रज्ञेचे पहिले ग्रंथकार.
- मराठी भाषेचे पाणिनी.

- जन्म : मुंबई येथे १८१४ मध्ये. मूळ घराणे वसई जवळील तर्खड येथील. बॉम्बे नेटिव्ह एज्यु.सोसा. मध्ये शिक्षण. काही काळ जावरा संस्थानच्या नवाबाचे शिक्षक. १८४० ला एल्फिन्स्टन इन्स्टि. मध्ये असिस्टंट टिचर म्हणून दाखल.
- १८५२ मध्ये अहमदनगरला डेप्युटी कलेक्टर पदावर नेमणूक. भिल्लांच्या बंडाचा यशस्वीपणे सामना केल्यामुळे त्यांना रावबहादूर ही पदवी दिली. १८६२ मध्ये निवृत्त.

## ***सामाजिक व धार्मिक सुधारणा :-***

**मानवधर्मसभा :**

सुरत येथे दुर्गाराम मंछाराम, दिनमणी शंकर दलपतराय यांच्या सह १८४४ साली मानवधर्मसभा स्थापन. मूर्तीपूजा अमान्य. जातीसंस्थेला विरोध. हिंदू धर्माला शुद्ध रुप आणण्यासाठी प्रयत्न. या सभेच्या प्रचारासाठीच त्यांनी धर्मविवेचन हा ग्रंथ लिहिला.

**परमहंससभा :-**

१८४९ साली मुंबई येथे मानवधर्मसभेतील काही अनुयायांसह परमहंस सभा स्थापन. मानवधर्मसभेसारखीच तत्त्वे. आत्माराम पांडूरंग, भाऊ महाजन यासारखी मंडळी सभेमध्ये. जातिभेद मोडून काढण्याचा निर्धार. एकेश्वरवादाचा पुरस्कार. सर्व सभासदांना एकत्रित भोजन घ्यावे लागे. या सभेच्या मार्गदर्शनासाठी दादोबा पांडूरंग यांनी पारमहंसिक ब्राह्मधर्म हा काव्यग्रंथ लिहिला. १८६० पर्यंत सभेचे कामकाज सुरु. त्यानंतर सदस्यांची यादी चोरीला गेल्यामुळे सभा फुटली.

***शैक्षणिक कार्य :-***

- १८४८ साली **ज्ञान प्रसारक सभा** स्थापन. ज्ञान प्रसार व सामाजिक जागृती.

***वाङ्मयीन क्षेत्रातील कार्य :-***

- मराठी भाषेचे व्याकरण, मराठी नकाशाचे पुस्तक, विद्येच्या लाभाविषयी, विधवाश्रुमार्जन, यशोदा पांडूरंगी, पारमहंसिक ब्राह्मधर्म, आत्मचरित्र, शिशुबोध इ. ग्रंथ. यमुना पर्यटन या बाबा पद्मनजी यांच्या ग्रंथात दादोबा पांडुरंग यांचा पुनर्विवाहविषयक लेख.

**योग्यता :-**

मराठी भाषेचे पाणिनी.

**न्या. रानडे :** धर्म जिज्ञासा करणाऱ्या तत्वचिंतकांच्या श्रेणीत दादोबा पांडूरंग यांना अत्युच्च स्थान देण्यात यावे अशीच त्यांची योग्यता आहे.

## ४) गोपाळ हरी देशमुख ऊर्फ लोकहितवादी (१८२३-१८९२) :-

- महाराष्ट्रातील राष्ट्रवादी विचारांचे प्रवर्तक.
- जन्म : पुणे येथे १८ फेब्रु १८२३. उपनाम सिधये. शिक्षणानंतर १८४४ मध्ये भाषांतरकार म्हणून नोकरी. १८४६ मध्ये मुन्सफ. १८५२ मध्ये असिस्टंट कमिशनर. १८६२ मध्ये अहमदाबाद येथे असि. जज्ज.
- जस्टीस ऑफ पीस व रावबहादूर या पदव्या.
- १८८० मध्ये मुंबई इलाख्याच्या विधिमंडळाचे सदस्य.
- निवृत्त झाल्यावर लोकहितवादी हे मासिक सुरु केले.

***वाङ्‌मयीन व वृत्तपत्र क्षेत्रातील कार्य :-***

- १८४८ मध्ये भाऊ महाजन यांच्या प्रभाकर या साप्ताहिकात त्यांनी लोकहितवादी या नावाने लिहायला सुरुवात केली. त्यांनी शतपत्रे लिहिली. समाजाला उद्देशून पत्रे.
- वेगवेगळया विषयांवर ३६ ग्रंथ.
- लक्ष्मीज्ञान, हिंदुस्थानास दारिद्र्य येण्याची कारणे, स्थानिक स्वराज्य व्यवस्था, ग्रामरचना इ. महत्वाचे ग्रंथ.
- हिंदुस्थानचा इतिहास, गुजरात, लंका, राजस्थान, पानिपत, इ. विषयांवर लेखन.
- पृथ्वीराज चौहान, स्वामी दयानंद सरस्वती यांची चरित्रे.

**योग्यता :-**

**ना.सिं.इनामदार :** पेशवाईच्या अस्तानंतर संधिकाळात व संक्रमणावस्थेत जी वैचारिक क्रांती या भागात झाली, तिचे नेतेपद लोकहितवादींना बहाल करण्यास प्रत्यवाय नाही. इंग्रजी काळातील बुद्धिवादी नेता असेच त्यांचे वर्णन करावे लागेल.

## ५) डॉ. भाऊ दाजी लाड ( १८२४-१८७४) :-

- मूळ गोव्यातील पेडणे तालुक्यातील पार्से या गावचे रहिवासी. मूळ नाव रामचंद्र विठ्ठल लाड. जन्म : मांजरी येथे १८२४ साली.
- १८४५ साली मुंबई येथे ग्रॅण्ट मेडिकल कॉलेज सुरु झाले. भाऊंनी या कॉलेजात प्रवेश घेतला. १८५१ मध्ये वैद्यकीय पदवी. मुंबईतील धनवानांच्या मदतीने गरिबांसाठी दवाखाना काढला. कुष्ठरोगावर एक उत्कृष्ट औषध शोधून काढल्यामुळे ते धन्वंतरी म्हणून ओळखले जाऊ लागले. देवीची लस लोकप्रिय करण्यासाठीही त्यांनी खूप परिश्रम घेतले.

***राजकीय कार्य :-***

- ब्रिटीश आमदानीत भारतीयांना समानतेची वागणूक मिळवण्यासाठी संघर्ष.
- १८५२ साली सुरु झालेल्या बॉम्बे असोशिएशनचे पहिले चिटणीस.
- १८४५ साली स्टुडंट लिटररी ॲण्ड सायंटिफिक सोसायटीची स्थापना.

***वाङ्मयीन व ऐतिहासिक कार्य :-***

- जैनधर्माची परंपरा, जैन पट्टावतीचा कालानुक्रम, हेमाद्रीचा काल इ.बाबत संशोधनपर ग्रंथ.
- त्यांचे वाङ्मय दि लिटररी रिमेन्स ऑफ भाऊ दाजी या नावने प्रकाशित झालेले आहे.

**योग्यता :-**

**ग.त्र्यं.माडखोलकर :** डॉ.भाऊ दाजी हे नुसते सनदशीर राजकीय चळवळीचे प्रवर्तक आणि प्रवक्ते नव्हते तर भारतीय स्वातंत्र्याचे आद्य द्रष्टे आाणि उद्घोषकही होते.

**न्या.रानडे :** त्यांच्या मनाची सार्वजनिक चळवळीकडे प्रवृत्ती होण्यास डॉ. लाड, दादाभाई वगैरे थोर समाजसुधारकांची प्रत्यक्ष उदाहरणेच कारणीभूत ठरली. डॉ. लाड यांनी इंग्रजी राजवटीच्या काळात गतिहीन समाजाला जागृत करण्याचे महत्वाचे कार्य केले.

## ६) विष्णुशास्त्री पंडित ( १८२७-७६) :-

- मूळ गाव सातारा जिल्ह्यातील बावधन. शिक्षणानंतर त्यांनी नोकरी करता करता विधवा विवाहाचे कार्य हाती घेतले.

***<u>वृत्तपत्र वाङ्मयीन क्षेत्रातील कार्य :-</u>***

- इंदुप्रकाश या वृत्तपत्रात १८६४ साली उपसंपादक म्हणून काम पाहण्यास प्रारंभ. हे वृत्तपत्र १८६२ साली सुरु झाले होते.
- नाना फडणवीस यांची बखर, ब्राह्मणकन्या विवाह, इंग्रजी-मराठी कोश, विधवा विवाह, संस्कृत आणि महाराष्ट्र धातू कोश, शूद्रधर्म, स्मृतीशास्त्र इ. पुस्तके.

***<u>सुधारणाविषयक विचार व कार्य :-</u>***

- स्त्रियांच्या सुधारणेचा मुद्दा हाती घेतला.
- १८६५ साली विधवा पुनर्विवाहोत्तेजक मंडळ ची स्थापना.

१८७४ मध्ये पहिली पत्नी वारल्यानंतर त्यांनी कुसाबाई या विधवेशी विवाह.

**<u>भाऊ महाजन</u>** ( इ.स.1815 ते 1890) :

- भाऊ महाजन कुंटे.
- जन्म : कुलाबा जिल्हयात पेण येथे 1815 मध्ये.
- बाळशास्त्री जांभेकरांचे वर्गमित्र.दर्पण व दिग्दर्शन मध्ये लेखन.
- प्रभाकर नावाचे साप्ताहिक सुरु.
- धूमकेतू व ज्ञानदर्शन मधून सामाजिक विषयांवर लेखन.
- त्यांच्या प्रभाकर या वृत्तपत्रामधून लोकहितवादी यांनी शतपत्रे लिहिली.
- 1890 मध्ये मृत्यू.

**<u>विष्णुबुवा ब्रम्हचारी</u>** ( इ.स.1825 ते 1871) :

- जन्म : कुलाबा (रायगड) जिल्ह्यात शिरवली येथे.
- नाव : विष्णू भिकाजी गोखले.

- विष्णुबुवांनी ख्रिश्चन धर्मप्रसारकांना उत्तर देण्यासाठी मुंबईत जाहीर व्याख्याने दिली. वैदिक धर्मावरील आक्षेप चुकीचे असल्याचे दाखवून वैदिक धर्माची महानता पटवून सांगितली.
- वर्तमानदीपिका या वर्तमानपत्राद्वारे वैदिक धर्मावरील टीकेला चोख प्रत्युत्तर .
- प्रौढविवाह, पुनर्विवाह, घटस्फोट, शुध्दीकरण या विषयी पुरोगामी विचार .
- भावार्थ सिंधू, वेदोक्त, धर्मप्रकाश, सुखदायक राज्यप्रकरणी निबंध, सहजस्थितीचा निबंध, बोधसागर रहस्य, सेतुबंधानी टीका इ.ग्रंथ.
- 18 फेब्रुवारी 1871 रोजी मृत्यू.

**<u>सावित्रीबाई फुले</u>** ( 1831 ते 1897) :



- जन्म : 3 जाने 1831. सातारा जिल्हयातील खंडाळा तालुक्यातील नायगाव येथे.
- महात्मा फुले यांना निष्ठेने साथ.
- महाराष्ट्रातील पहिल्या स्त्री शिक्षिका.
- महात्माजींनी सुरु केलेल्या बालहत्या प्रतिबंधक गृहातील अनाथ मुलांचे संगोपन.
- 1897 च्या पुण्यातील प्लेग च्या साथीच्या वेळी रोग्यांची शुश्रूषा. प्लेग मुळेच मृत्यू.(10 मार्च)
- बावनकशी सुबोधरत्नाकर, काव्यफुले हे साहित्य.

**बाबा पदमनजी** ( 1831 ते 1906) :

- जन्म : बेळगाव. आडनाव : मुळे.
- त्यांच्या घराण्याचा सूरतमध्ये जडजवाहिरांचा व्यापार. त्यांचा ओढा धर्माचरण व धर्माभ्यासाकडे.
- मुंबईत आल्यानंतर इंग्रजी, मराठी, संस्कृत, कन्नड, गुजराती अशा भाषांचा अभ्यास.
- मुंबईत त्यांनी विल्सन फ्री चर्च स्कूलमध्ये शिक्षण घेतले.
- ख्रिस्ती धर्मातील मानवतावादामुळे ते ख्रिस्ती धर्माकडे आकृष्ट.
- 1854 मध्ये ख्रिस्ती धर्म स्वीकारला.
- पुणे येथे आल्यानंतर फ्री चर्च च्या शाळेत शिक्षकाची नोकरी. पुढे त्यांच्यावर बायबल आणि ट्रस्ट सोसायटीच्या संपादकाचे काम.
- मूर्तीपूजा व जातिभेदाला विरोध.
- परमहंस सभेचे सक्रिय सदस्य. विधवा पुनर्विवाहाचे पुरस्कर्ते.
- यमुना पर्यटन या कादंबरीतून स्त्रियांच्या दु:खाला वाचा फोडली.
- अरुणोदय नावाचे आत्मचरित्र.
- इंग्रजी-मराठी व संस्कृत-मराठी असे शब्दकोश लिहिले.

**सार्वजनिक काका ( 1828 ते 1880) :**

- गणेश वासुदेव जोशी म्हणजेच सार्वजनिक काका.
- 9 एप्रिल 1828 रोजी सातारा येथे.
- पुण्यात शिक्षण घेऊन वकिलीचा व्यवसाय सुरु.
- वासुदेव बळवंत फडक्यांचे वकीलपत्र.
- 1870 साली श्रीमंत श्रीनिवासराव पंतप्रतिनिधी यांच्या अध्यक्षतेखाली पुण्यात सार्वजनिक सभा स्थापन.
- 1876-77 मधील दुष्काळात सार्वजनिक सभेमार्फत दुष्काळग्रस्त लोकांना भरीव मदत.
- देशाच्या उन्नतीसाठी लघुउदयोगाचा आग्रह. स्वदेशीचा पुरस्कार. स्वदेशी मालाची दुकाने.

- जातीभेदाला विरोध. वृत्तपत्र स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते.

**डॉ.रा.गो.भांडारकर ( 1837-1925) :**

- प्रार्थना समाजाचे सहसंस्थापक. जन्म : मालवण येथे 6 जुलै 1837 मध्ये. आडनाव : पत्की.
- मुंबई विदयापीठातून एम.ए.ची पदवी. जर्मन विदयापीठाची पीएच.डी.मिळवली.
- भाषातज्ज्ञ व प्राचीन इतिहासाचे संशोधक.प्राच्यविदया संशोधक. संस्कृत पंडित.
- स्वत:च्या विधवा मुलीचा पुनर्विवाह घडवून आणून विचाराला कृतीची जोड दिली.
- मुंबई प्रांताच्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे सदस्य, केंद्रीय लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे सदस्य.
- अर्ली हिस्ट्री ऑफ डेक्कन, वैष्णविझम, शैविझम अॅंड अदर मायनर रिलिजन्स, हिस्ट्री ऑफ इंडिया, इ.विपुल लेखन.

**बेहरामजी मलबारी ( 1853- 1912) :**

- गुजरातमधील बडोदा येथे पारशी कुटुंबात जन्म. शिक्षण इंग्रजी मिशनरी शाळेत.
- बालविवाहाच्या प्रथेला विरोध. विधवा पुनर्विवाहासाठी प्रयत्न.
- इंडियन स्पेक्टॅटर हे साप्ताहिक.
- दादाभाई नौरोजी यांच्या व्हॉईस ऑफ इंडिया या नियतकालिकात लेखन.
- दयाराम गिडूमल यांच्या मदतीने सेवा सदन ही संस्था स्थापन
- गुजरात अॅण्ड गुजराथीज, नीती विनोद, बालविवाह व महिलांवर सक्तीने लादण्यात आलेले वैधव्य इ.ग्रंथांचे लेखन.

**पंडिता रमाबाई ( 1558-1922) :**



- जन्म : कर्नाटकातील मंगळूर जिल्हयातील गंगामुळे या गावी. आडनाव : डोंगरे.
- वडिलांकडून प्राचीन हिंदू शास्त्रांचे शिक्षण.
- 16 व्या वर्षी आई-वडीलांचा मृत्यू. बंधू श्रीनिवास याच्यासह तीर्थयात्रा.
- कलकत्ता येथे ज्ञानाची चूणूक दाखवून दिली.
- लोकांनी त्यांना सरस्वती व पंडिता या पदव्या दिल्या.
- पतीच्या निधनानंतर पुण्यात आल्या.
- 1882 साली आर्य महिला समाज ची स्थापना. हंटर कमिशन समोर साक्ष.
- मिशन-यांच्या मदतीने इंग्लंड व अमेरिकेला गेल्या.
- ख्रिश्चन धर्माचा स्वीकार .
- 1889 मध्ये मुंबईत शारदा सदन या संस्थेची स्थापना. निराश्रीत व विधवा स्त्रियांच्या राहण्याची व्यवस्था.
- 1890 मध्ये शारदा सदन संस्था पुण्याला हलविली.
- केडगाव येथे मुक्तीसदन ही संस्था सुरु. त्यात अनाथ व विधवा स्त्रियांच्या शिक्षणाची, निवासाची आणि भोजनाची मोफत सोय केली.
- बायबलचे मराठी भाषांतर, स्त्रीधर्म नीती, दि हायकास्ट हिंदू वूमन, हे ग्रंथ.

**न्या.महादेव गोविंद रानडे ( 1842 ते 1901) :**



- जन्म : 18 जानेवारी 1842, निफाड .
- प्राथ.शिक्षण कोल्हापुरात.पुढील शिक्षण मुंबई.
- एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये इंग्रजी व इतिहास विषयांचे प्राध्यापक.
- पुढे न्यायाधीश म्हणून पुण्यात आले.
- प्रार्थना समाजाची स्थापना.
- सामाजिक परिषदेची स्थापना1887.
- मुंबई येथे विधवा विवाह घडवून आणला.
- सनदशीर राजकारणचा पाया घातला.हिंदी राजकारणाला अर्थशास्त्रीय विचारांची जोड .
- पुण्यात वसंत व्याख्यानमाला सुरु.
- द राईज ऑफ मराठा पॉवर हे पुस्तक गाजले.

# <u>महाराष्ट्रातील धार्मिक सुधारणा चळवळी :</u>

**आर्य समाज :-**



स्वामी दयानंद सरस्वती यांनी १८७५ साली मुंबई येथे आर्य समाजाची स्थापना केली. पुढे १८७७ साली आर्य समाजाची लाहोर येथे शाखा स्थापन झाली व त्यानंतर आर्य समाजाचे मुख्यालय लाहोर हेच बनले.

**आर्य समाजाचे तत्वज्ञान :**

१) वेद व त्यातील तत्वज्ञान हेच खरे तत्वज्ञान.

२) वेद अपौरुषेय असून वेद हेच हिंदूंचे खरे धर्मग्रंथ व वेदकालीन समाजव्यवस्था ही आदर्श समाजव्यवस्था.

३) परमेश्वर एकच असून तो निराकार, सर्वशक्तीमान, कृपाळू, दयाळू, व सर्व सृष्टीचा नियंता व निर्माता आहे.

४) वेद अध्ययनाचा हक्क सर्व मनुष्यमात्रांना आहे.

५) चातुर्वर्ण्य हे जन्मसिद्ध नसून गुणकर्मावर अवलंबून असावेत.

६) शुद्धीकरणाने कोणासही हिंदू धर्मात प्रवेश घेता येईल.

७) अस्पृश्यता, कर्मकांड मान्य नाही.

- वेदांकडे परत चला: दयानंदांचा धर्मबांधवांना संदेश.
- शुद्धीकरण चळवळ.
- भगिनी निवेदिता यांनी या समाजाचे वर्णन लढाऊ हिंदू धर्म असे केले आहे.
- अनेक ठिकाणी संस्कृत पाठशाळा स्थापन केल्या.

- पाश्चात्य शास्त्रे व संस्कृती यांचा अभ्यास करण्यासाठी त्यांनी लाहोरला Indian Academy ही संस्था स्थापन.
- आर्य समाजाच्या प्रसारासाठी सत्यार्थ प्रकाश नावाचा ग्रंथ दयानंदांनी लिहिला.

१८८३ साली दयानंदांचा मृत्यू.

दयानंदांच्या मृत्यूनंतर त्यांच्या अनुयायांमध्ये दोन गट निर्माण झाले. त्यापैकी लाला हंसराज यांनी लाहोर येथे दयानंद अँग्लो वैदिक कॉलेज स्थापन करून नंतर या कॉलेजच्या शाखा देशभर नेल्या. दुसरे शिष्य स्वामी श्रद्धानंद यांनी हरिद्वार (कांगडी) येथे गुरुकुल ही शिक्षणसंस्था स्थापन केली. लाला लजपतराय हे देखील आर्य समाजाचे महत्वाचे कार्यकर्ते होते.

## सत्यशोधक समाज



२८ सप्टेंबर १८७३ या दिवशी महात्मा ज्योतीराव गोविंदराव फुले यांनी पुण्यात स्थापना केली. सामाजिक विषमता व दलितांची दु:खे नाहीशी करणे, समाजातील भटभिक्षुकांच्या व उच्चवर्णीयांच्या जूलूमांचा प्रतिकार करणे, त्यासाठी अज्ञानी बहुजन समाजाला ज्ञानी करुन सोडणे, मानवधर्माचे व ईश्वरभक्तीचे सत्य स्वरूप समाजासमोर ठेवणे, हे उद्देश सत्यशोधक समाजाच्या स्थापनेमागे होते.

**सत्यशोधक समाजाचे तत्वज्ञान :**

१) ईश्वर एक असून तो सर्वव्यापी व निर्गुण, निर्विकारी, सत्स्वरुप आहे व सर्व मनुष्यप्राणी त्याची प्रिय लेकरे आहेत.

२) ईश्वरभक्ती करण्याचा प्रत्येक मानवास पूर्ण अधिकार आहे. आईस संतुष्ट करण्यास अगर बापास विनविण्यास जशी मध्यस्थ दलालाची जरूरी नसते, त्याप्रमाणे सर्वसाक्षी परमेश्वराची भक्ती करण्यास भट-दलालांची आवश्यकता नाही.

३) मनुष्य जातीने श्रेष्ठ ठरत नसून तो गुणाने श्रेष्ठ ठरतो.

४) कोणताही ग्रंथ सर्वस्वी प्रमाण व ईश्वरप्रणीत नाही.

५) पुनर्जन्म, कर्मकांड, जपतप या गोष्टी अज्ञानमूलक आहेत.

महात्मा फुल्यांच्या प्रेरणेने स्थापन झालेल्या सत्यशोधक समाजाने शेतकरी, रयत, सरकारी अधिकारी व ब्राह्मणवर्ग यांच्याकडून पिळली जाणारी सामान्य माणसे, कामगार, स्त्रिया, अस्पृश्य अशा बहुजन समाजाच्या उद्धारासाठी जी सामाजिक क्रांतीची चळवळ सुरु केली, त्या क्रांतीमुळे पुढे राजर्षी शाहू महाराज, कर्मवीर भाऊराव पाटील इ. समाजसुधारकांना प्रेरणा मिळाली.

आपल्या व सत्यशोधक समाजाच्या विचारांचा प्रसार करण्यासाठी ज्योतीबांनी १८७७ साली दीनबंधू नावाचे वृत्तपत्र सुरु केले. या वृत्तपत्राचे संपादक कृष्णराव भालेकर होते.

**प्रार्थना समाज :-**

ब्राह्मो समाजाचे नेते केशवचंद्र सेन यांच्यापासून प्रभावित होऊन मुंबईत आत्माराम पांडूरंग तर्खडकर, न्या.रानडे, डॉ. भांडारकर, गोपाळ हरी देशमुख यांनी १८६७ साली प्रार्थना समाजाची स्थापना केली.

प्रार्थना समाजाची तत्त्वे :

१) मूर्तीपूजा व अवतार कल्पना मान्य नाही. मात्र ईश्वर सगुण आहे हे मान्य.

२) शंकराचार्यांचे निर्गुण परब्रह्म व मायावाद प्रार्थना समाज अमान्य करतो.

३) ईश्वर भक्तीने प्रसन्न होतो.

४) जीवात्मा व परमात्मा एक नसून ते दोन आहेत.

५) आत्मिक उन्नतीसाठी प्रार्थना आवश्यक आहे.

प्रार्थना समाजाचे अनुयायी आपले कट्टर हिंदुत्व कायम ठेऊन धर्मात सुधारणा करु इच्छित होते. प्रार्थना समाजाने महाराष्ट्रातील सुशिक्षित वर्गात समाजसुधारणेच्या चळवळीची पार्श्वभूमी तयार केली. या समाजाचे नेते कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांनी दलितोद्धारासाठी डिप्रस्ड क्लास मिशन ही संस्था स्थापन केली. डेक्कन एज्युकेशन सोसायटी व ना. गोपाळ कृष्ण गोखले यांनी स्थापन केलेला भारत सेवक समाज या संस्था प्रार्थना समाजाच्या चळवळीतून निर्माण झाल्या होत्या.

**परमहंस मंडळी :-**

सूरत येथील मानवधर्मसभेचे कामकाज बंद पडल्यानंतर दादोबा पांडूरंग तर्खडकर व बाळशास्त्री जांभेकर यांनी १८४९ साली मुंबई येथे या संस्थेची स्थापना केली.

परमहंस मंडळींची तत्त्वे :

१) फक्त परमेश्वराची पूजा करावी.

२) खरा धर्म प्रेम व सदाचार यावर आधारित असतो.

३) आध्यात्मिक धर्म एकच असतो.
४) प्रत्येकास अविष्कारस्वातंत्र्य असावे.
५) आपले बोलणे व वागणे तर्कसंगत असावे.
६) मानवजात ही एकच जात आहे.
७) योग्य ज्ञान सर्वांना दिले जावे.

जातपात नष्ट करीन आणि शूद्रांसमवेत मी भोजन करीन अशी शपथ या संस्थच्या सभासदांना घ्यावी लागत असे.त्यांच्या बैठका गुप्तपणे घेतल्या जात होत्या.त्यांना सनातनी हिंदूंना उघडपणे विरोध करायचा नसावा. १८६० नंतर परमहंस मंडळींचे कार्य थांबले.

# स्वातंत्र चळवळीतील महाराष्ट्राचे योगदान

## 1818 ते 1885

### 1) रामोशी, कोळी आणि भिल्ल यांचा उठाव

**अ) उमाजी नाईक  यांचा उठाव :**



- रामोशी स्वत:ला रामवंशी समजत.शरीराने बळकट, उंचेपुरे, बांधेसूद व राकट.
- निजामाच्या प्रदेशातील शोरापूरच्या राजास ते आपला प्रमुख मानत असत आणि आपल्या नावापुढे नाईक अशी संज्ञा लावत असत.पुणे प्रांतात रामोशांमध्ये चव्हाण आणि जाधव अशा दोन आडनावांची लोक दिसतात.
- रामोशी लोक शेती, पशुपालन, किल्ल्यांचा बंदोबस्त आणि मोठया वाडयांवर पहारेकरी इ. कामे करत. किल्ल्याच्या रक्षणाच्या बदल्यात ठराविक गावांत महसूल गोळा करण्याचा अधिकार त्यांना असे. मात्र इंग्रजांच्या राजवटीत त्यांना कामावरुन कमी करण्यात आले. त्यांची इनामेही जप्त करण्यात आली.त्यामुळे हे लोक दरोडे घालू लागले.त्यामुळे ब्रिटीश कायदे व्यवस्था धोक्यात आली.

**उमाजी नाईक :**

- जन्म :  पुरंदरमधील भिवरी येथे 1791.
- पुरंदर किल्ल्याच्या बंदोबस्ताचे काम.

- 1818 साली भोर जवळ विंग गावात दरोडा टाकत असताना उमाजी पकडला गेला.
- तुरुंगात शिक्षा भोगत असताना उमाजीने अक्षर ओळख करुन घेतली.
- संतू नाईक च्या नेतृत्वाखाली भांबुडर्याचा लष्करी खजिना लुटला ( 1824-25)
- पुढे उमाजीकडे रामोशांचे पुढारपण आले.अनेक दरोडे टाकले, वाटमा-या केल्या.
- 1826 मध्ये इंग्रजांनी उमाजीविरोधात पहिला जाहीरनामा काढला. 100 रुपयांचे बक्षीस.
- लोक उमाजीच्या बाजूने असल्याने उमाजीला पकडण्यात अपयश.
- मोक्याच्या जागी चौक्या बसवल्या, घोडदळ तयार केले.पण उपयोग झाला नाही.
- इंग्रजांनी उमाजीला पकडून देणा-यास असलेली बक्षीसाची रक्कम 1200 रुपये केली.
- उमाजीने स्वत:ला राजे म्हणून घ्यायला सुरुवात केली.कुठल्याही डोंगरकपारीत दरबार भरत असे.
- गोरगरिबांना दक्षिणा देणे, दान देणे, अशी तो मदत करत असे.
- पुण्याचा कलेक्टर एच.डी.रॉबर्टसन व उमाजी यांनी परस्परांविरोधात जाहीरनामे काढले.
- इंग्रजांनी उमाजीच्या बायको व मुलांनाा पकडून कैद केल्याने अखेर उमाजीने इंग्रजांपुढे शरणागती पत्करली. इंग्रजांनी त्याचे सर्व गुन्हे माफ केले.त्याने सरकारी नोकरी स्वीकारली. पुणे व सातारा या भागात शांतता टिकवण्याची जबाबदारी त्यांच्याकडे सोपवण्यात आली. मात्र भोर संस्थानातील 13 गावांच्या महसूलावरुन त्यांचा इंग्रजांशी संघर्ष झाला. उमाजीने पुन्हा बंड केले.
- पुन्हा रामोश्यांच्या टोळया तयार केल्या.
- उमाजीला पकडण्याची जबाबदारी कॅ.अलेक्झांडर व कॅ.मॅकिन्टॉश यांच्यावर सोपविली.
- पुण्याचे तेव्हाचे कलेक्टर जॉर्ज जिबर्न व उमाजी यांनी परस्परांविरोधात जाहीरनामे काढले.
- 1831 मध्ये जाहीरनामा काढून इनामाची रक्कम 10, 000 रुपये व 400 बिघा जमीन एवढी केली.
- बातमी पुरवणा-यास 5000 रुपये रोख व 200 बिघा जमीन
- उमाजीचे जवळचे सहकारी काळू व नाना या अमीषाला बळी पडले.

- काळू व नाना यांनी विश्वासघाताने उमाजीला पुण्याच्या मुळशी जवळ आवळस येथे आणले.
- 25 डिसेंबर 1831 रोजी उमाजीला पकडून इंग्रजांच्या स्वाधीन करण्यात आले.
- त्याला गुन्हेगार ठरवून 3 फेब्रुवारी 1834 ला फाशी देण्यात आले.

## ब) कोळयांचे उठाव :

- कोळयांची मुख्यत: वस्ती मध्य प्रदेश, दक्षिण महाराष्ट्र, गुजरात व कोकण या भागात आहे. महाराष्ट्रात कोळयांचे साधे कोळी व डोंगरी कोळी असे भेद असून सोनकोळी, महादेव कोळी इ. पोटभेद आहेत.
  - किल्ल्यांच्या बंदोबस्तामध्ये त्यांचे महत्त्वाचे स्थान होते. परंतु इंग्रजी राजवटीत किल्ल्यांची व्यवस्था पूर्णत: बदलली गेल्यामुळे कोळयांच्या नोक-या गेल्या . शेतीवर उदरनिर्वाह करावा, तर इंग्रजांनी जमीनी काढून घेतल्या. त्यामुळे कोळयांवर उपासमारीची पाळी आली. त्यामुळे कोळी इंग्रजांच्या विरोधात गेले.

कोळयांचे उठाव तीन टप्प्यात झाले :

**पहिला टप्पा :**

- 1824 च्या दरम्यान मुंबई भागात नेटिव्ह इन्फंट्रीने उठाव केला. तो उठाव ब्रिटीशांनी दडपला व त्या भागात शांतता निर्माण केली. पोलीस दलातील कोळी जमातीचा अधिकारी रामजी भांगडिया हा अत्यंत नाराज झाला. त्याने आपल्या पदाचा राजीनामा देऊन जमातीचे प्रश्न सोडवण्यासाठी प्रयत्न सुरु केले. सारा भरण्यास नकार देऊन कोळयांचे संघटन सुरु. शस्त्रास्त्रे जमवली.
- 1828 साली रामजी भांगडियाच्या नेतृत्वाखाली कोळयांनी उठाव केला. हा संघर्ष दोन वर्षे सुरु होता. कॅ.अलेक्झांडर व मॅकिन्टॉश यांनी हा उठाव मोडून काढला.

**दुसरा टप्पा :**

- कोळयांनी पुन्हा उठाव करण्यासाठी शस्त्रास्त्रे गोळा केली.

- 1839 ला पुण्यात एकदम उठाव केला.
- यावेळी दोन घोषणा करण्यात आल्या.
- दुस-या बाजीरावास पेशवेपद देऊन पुन्हा मराठी राज्याची स्थापना झाली आहे, व संपूर्ण राज्य कोळयांच्या ताब्यात आहे.
- घोडनदी येथील सरकारी खजिन्याला 150 कोळयांनी वेढा घातला.मात्र रोझ या असिस्टंट कलेक्टर ने उठाव मोडून काढण्यात यश मिळवले.  54 कोळयांना पकडण्यात आले.
- पुढील 5 वर्षे कोळी शांत राहिले.

**तिसरा टप्पा :**

- रघू भांगडिया आणि बापू भांगडिया यांच्या नेतृत्वाखाली पुणे, नाशिक, नगर परिसरात उठाव केला. पुणे व सातारा येथेही लोण पसरले.
- 1845 मध्ये बापू भांगडिया ला पकडण्यात यश आले. त्यामुळे कोळयांमधील असंतोष वाढला.
- कोळयांनी लुटालुटीचे सत्र सुरु केले. उठावाचे लोण कोकण व प.महाराष्ट्रात पसरले.
- कॅ.जेल ने उठाव दडपण्यास सुरुवात केली. 1850 पर्यंत कोळयांच्या उठावाचा कायमचा बंदोबस्त करण्यात आला.

## क) भिल्लांचे उठाव :

- भिल्लांची वस्ती अरवली, विंध्य, सह्याद्री व सातपुडा पर्वत रांगांमध्ये.
- खानदेशात जास्त वस्ती.
- शेती, पशुपालन, मासेमारी, शिकार हे त्यांच्या उपजिवीकेचे साधन.
- बरडा, डागची, माऊची, वसावा, तडवी इ.जाती.

- पेशवाईच्या अखेरच्या काळात खानदेशात माजलेल्या अराजकाचा फायदा घेत भिल्लांनी 1803 मध्ये उठाव केला.पेंढारी लोकांचा पाठिंबा मिळाला.
- 1818 मध्ये अजंठा, सातमाळा भागात उठाव.
- कॅ.बिग्ज या कलेक्टर ने या भागात उठाव मोडून काढण्यासाठी प्रयत्न केले.
- दडपशाही यशस्वी न झाल्यानंतर त्याने सौम्य धोरण स्वीकारत भिल्लांना पेन्शन देण्यास सुरुवात केली. शरण आलेल्या भिल्लांना माफी देण्यास सुरुवात.
- मात्र तरीही उठाव सुरुच राहिला. त्यामध्ये सातमाळच्या चिलनाईक याचा समावेश होता. त्याने इंग्रजांना हैराण करुन सोडले. कॅ.बिग्ज ने त्याला पकडून फाशी दिले.
- 1822 मध्ये पुन्हा हिरा नावाच्या भिल्लांच्या नेतृत्वाखाली उठाव.
- 1825 मध्ये सेवाराम घिसाडी याच्या नेतृत्वाखाली पुन्हा उठाव. सेवारामच्या उठावास देशी संस्थानिक, देशमुख यांचा पाठिंबा मिळत गेला.उठावाचे स्वरुप व्यापक बनले.
- ले.ऑटट्रम ने सेवारामला पकडले. त्याच्यासह त्याच्या साथीदारांचे गुन्हे माफ केले. त्यांच्या जमीनी त्यांना परत दिल्या.भिल्लांचे कायमचे पुनर्वसन करण्यासाठी सैन्यभरती, बंदोबस्ताचे काम , सरकारतर्फे बी-बियाणे पुरवणे अशी कामे व काही योजना सुरु केल्या.

## 2) 1857 चा उठाव आणि महाराष्ट्र :

### रंगो बापूजी गुप्ते :

- सातारचे छत्रपती प्रतापसिंह यांचे गेलेले राज्य परत मिळवण्यासाठी रंगो बापूजी गुप्ते यांनी प्रयत्न केले. त्यानिमित्ताने ते इंग्लंडला गेले. मात्र हताश होऊन परतावे लागले. त्यामुळे त्यांनी 1857 च्या उठावात भाग घेतला.
- युरोपियन अधिका-यांना ठार करणे, सरकारी खनिजे लुटणे, कैदयांची सुटका करणे, त्यासाठी भोरपासून बेळगावपर्यंत हिंडून मांग, रामोशी, कोळी यांना एकत्र करुन सैन्य उभारले.
- उठावासाठी कोल्हापूर, पंढरपूर, फलटण, वाठार, बेळगाव, कळंबी, कराड, आरळे, देऊर इ.ठिकाणे निवडली.
- इंग्रजांना त्यांच्या हालचालींचा सुगावा लागल्यानंतर ते भूमिगत झाले.

### कोल्हापूर मधील उठाव :

- पहिला उठाव 31 जुलै 1857 च्या रात्री 27 व्या रेजिमेंटमधील भारतीय सैनिकांनी यामध्ये पुढाकार घेतला. रेजिमेंटची तिजोरी लूटून युरोपियन अधिका-यांच्या घरावरही हल्ले केले. जेकब नावाच्या अधिका-याने हा उठाव मोडून टाकला.
- दुसरा उठाव 6 डिसेंबर 1857 रोजी घडून आला. कोल्हापूर, धारवाड, येथील हिंदी शिपायांनी बंडाची योजना आखली. मात्र ब्रिटीशांनी सावध होऊन उठाव मोडून काढला.

### पेठ मधील उठाव :

- नाशिक जिल्हयात पेठ या ठिकाणी कोळयांनी उठाव केला.पेठचा राजा भगवंतराव निळकंठराव यांनी नेतृत्व केले.6 डिसें 1857 रोजी कोळी लोकांनी हर्सूलच्या बाजारात अचानक लूट केली. त्यावेळी त्यांना भिल्लांनी मदत केली. सरकारी खजिना लूटला.
- ग्लासपूल या अधिका-याने बंड मोडून काढले.पेठच्या राजाला फाशी देण्यात आले.

**नगर-नाशिक मधील उठाव :**

- 1857 च्या बंडात नाशिक-नगर मध्ये भिल्लांनी उठाव केला. 21 जाने 1857 ला नांदगाव ला भिल्ल आणि इंग्रज यांच्यात जोराची चकमक झाली. ब्रिटीशांनी अनेक बंडखोरांना ठार केले.काहींना फाशी व काहींना जन्मठेप दिली गेली.

**जमखिंडी संस्थानातील उठाव :**

- जमखिंडीचे राजे आप्पासाहेब पटवर्धन होते.ते इंग्रजांच्या मर्जीतील होते. त्यांनी आपल्या संस्थानात उठाव होऊ नये म्हणून शस्त्रास्त्रे व दारुगोळा किल्ल्यास साठवला. परंतु त्याच्या या हालचालींबाबत इंग्रजांचा गैरसमज झाला. इंग्रजांनी संशयितांना ताब्यात घेतले. उठाव होण्यापूर्वीच तेथे बंदोबस्त करण्यात आला.

**मुधोळ मधील बेरड जमातीचा उठाव :**

- इंग्रज सरकारने 1857 मध्ये शस्त्रबंदीचा कायदा लागू करुन लोकांकडून हत्यारे आपल्याकडे जमा करुन घेण्यास सुरुवात केली..मुधोळमधील हुलगडीच्या बेरडांना हा कायदा मान्य नव्हता. कोणीही शस्त्रे जमा करु नयेत, असा प्रचार त्यांनी सुरु केला. मुधोळ च्या संस्थानिकाने इंग्रजांना बातमी कळवून सैन्य बोलावून घेतले. सैन्य व बेरड यांच्यात चकमक झाली. हुगळी येथे एका रात्रीत दोनशे बेसावध बेरडांची कत्तल करण्यात आली.

**नागपूर मधील उठाव :**

- नागपूर येथे 13 जून 1857 ही उठावाची तारीख ठरली होती. रात्री आकाशात शोभेच्या दारुचे फुगे सोडून इशारा दयायचा होता व इंग्रज रेसिडेन्सी, सीताबर्डीचा किल्ला, कामठी इ.ठिकाणे ताब्यात घ्यायची होती. मात्र इंग्रजांना याचा सुगावा लागला. आकाशात फुगे सुटणार नाहीत, याची काळजी घेतली. दुस-या दिवशी पकडलेल्या तीन बंडखोरांना फाशी देण्यात आले आणि अनेकांना जन्मठेप सुनावली.

**औरंगाबादमधील उठाव :**

- 1857 च्या उठावाच्या वेळी औरंगाबाद निजामी राजवटीत होते. सर्वत्र झालेल्या बंडामुळे तेथील इंग्रजी फौजेतील हिंदी शिपायांत चलबिचल सुरु झाली.तेथील घोडदळाच्या पलटणीत मुस्लीम शिपायांत चाललेल्या हालचालींबाबत इंग्रज साशंक बनले.उठावाचा उद्रेक होण्यापूर्वीच संशयित पकडले गेले.अनेकांना सैन्यातून बडतर्फ करण्यात आले.

## 3) शेतक-यांचे उठाव :

- पावसाचे कमी प्रमाण, शेतक-यांची दयनीय अवस्था, दुष्काळातही करवसुली, शेतमजुरांना मजुरी नाही, शेतीचे कमी उत्पन्न यामुळे शेतक-यांनी उठावात केले.
- 1874 साली पुणे जिल्हयातील शिरुर तालुक्यातील कर्धे गावापासून उठाव सुरु.सारा भरण्यास नकार . सावकारांवर हल्ले.
- 12 मे 1875 मध्ये सुपे येथे शेतक-यांनी पहिला उठाव केला.मारवाडी, गुजर व सावकारांवर हल्ले चढवले.नंतर नगर, सातारा, सोलापूर, रत्नागिरी या जिल्हयांत उठाव. नगर जिल्हयात सावकारांच्या घरांवर हल्ले करण्यात आले. गहाणखते जाळून टाकणे, सावकारांची मालमत्ता लुटणे असे प्रकार सुरु झाले.पुण्यात खून, लूटमार सुरु झाली.

मुंबई सरकारने उठावामागे असलेले दुष्काळाचे कारण लक्षात घेऊन व शेतक-यांच्या असंतोषाच्या इतर कारणांची चौकशी करण्यासाठी **डेक्कन रॉयटस कमिशन** नेमले. या कमिशनमध्ये 4 सदस्य होते.त्यांनी शेतक-यांबाबत अदूरदर्शीपणा हे शेतक-यांच्या असंतोषाचे कारण असल्याचे सांगितले.

सरकारने 1879 मध्ये **दि डेक्कन ॲग्रिकल्चर रिलिफ ॲक्ट** संमत केला. त्या✕न्वये तगाईची सोय असावी, शेतकरी बॅंका सुरु करणे, कर्जबाजारीपणामुळे शेतक-यांच्या जमीनी सावकारांकडे लगेचच हस्तांतरित होणार नाहीत, अशा प्रकारची तरतूद.

# <u>वासुदेव बळवंत फडके यांचा उठाव :</u>



- आदय क्रांतीकारक. 1857 च्या उठावानंतर इंग्रजांच्या विरोधात जो पहिला उठाव झाला, तो वासुदेव बळवंत फडके यांनी केला.
- जन्म 4 नोव्हेंबर 1846, रायगड जिल्हयातील शिरढोण येथे. त्यांच्या घराण्याकडे कर्नाळा किल्ल्याची किल्लेदारी होती.मात्र मराठी सत्तेच्या ऱ्हासानंतर त्यांच्या कुटुंबाचे उदरनिर्वाहाचे साधन नाहीसे झाले. शिक्षण पूर्ण करता आले नाही.
- उदरनिर्वाहासाठी प्रथम रेल्वे खात्यात लिपीक म्हणून कामाला लागले.त्यानंतर लष्करी खात्यात लेखाविभागात नोकरीस लागले.
- आईच्या अंत्यविधीस उपस्थित राहता न आल्यामुळे नोकरी सोडली.
- शस्त्रबळाखेरीज इंग्रज भारत सोडून जाणार नाहीत, असे त्यांना वाटे.
- पुण्यातील तरुणांमध्ये देशप्रेम निर्माण करण्यासाठी ते सार्वजनिक सभेच्या कार्यात भाग घेण्यास सुरुवात केली. न्या.रानडं, सार्वजनिक काका यांचा प्रभाव.
- 1873 मध्ये स्वदेशी वस्तू वापरण्याची शपथ घेतली.
- सामाजिक ऐक्यासाठी ऐक्यवर्धिनी संस्था सुरु केली.
- 1874 मध्ये पुणे येथे पूना नेटिव्ह इन्स्टिटयुशन ही शाळा सुरु करुन स्वदेशीचा पुरस्कार करण्याचा प्रयत्न. पुण्यातच इंग्रजांविरुध्द भाषणे देण्यास सुरुवात केली.
- लिटन च्या काळात व्हिक्टोरिया राणीला हिंदुस्थानची साम्राज्ञी ही पदवी दिल्याने फडकेंचा राग अनावर. गुप्त संघटना स्थापन करण्यासाठी तरुणांची जमवाजमव.

- 20 फेब्रुवारी 1879 नंतर त्यांनी रामोशी, कोळी, मांग, महार, मुसलमान इ.सहका-यांच्या मदतीने पुण्याच्या परिसरात दरोडे घालण्यास सुरुवात केली.इंग्रजांचे राज्य सनदशीर मार्गाने पराभूत होणार नाही, म्हणून क्रांतीचा मार्ग अवलंबला.
- दत्त महात्म्य हा सात हजार ओव्यांचा ग्रंथ लिहिला.
- दौलतराव नाईकांच्या मदतीने लोणीजवळ धामारी गावावर पहिला दरोडा.
- सरकारी खजिने लुटण्याऐवजी खेडयापाडयातील श्रीमंतांची घरे लुटण्यावर फडके यांचा भर .
- जेजुरी, खेड, लोणी, पुरंदर, वाल्हे या गावांवर दरोडे.
- 1879 मध्ये जाहीरनामा प्रसिध्द करुन आतापर्यंत फक्त येथील श्रीमंत लोकांविरुध्द चाललेली आमची मोहीम यानंतर आम्ही युरोपियनांसाठी सरु करु.युरोपियनांची कत्तल करु.1857 च्या बंडासारखे दुसरे बंड उभारु.असा इशारा दिला.
- लुटीवरुन रामोशांबरोबरचे संबंध बिघडले.
- पुण्याचा पोलीस प्रमुख मेजर डॅनियल याने फडके यांना पकडण्याची मोहिम उघडली.
- मुंबई सरकारने फडके यांना पकडण्यासाठी 4 हजार रुपयांचे रोख बक्षीस लावले. त्यास प्रत्युत्तर म्हणून फडके यांनी जाहीर केले की, मुंबईचे गव्हर्नर रिचर्ड टेंपल यांचे डोके कापून आणून देणा-यास दहा हजार रुपये बक्षीस दिले जाईल.
- फडक्यांनी नंतर कोकणाकडे आपला मोर्चा वळवला.
- रामोशांनी साथ सोडली.
- कोकणातून गाणगापूरला गेले. दरम्यान पुण्यात विश्रामबागवाडा आणि बुधवार वाडयाला आग लावण्यात आली. पोलीसांना फडक्यांवर संशय. मात्र ही आग कृष्णाजी रानडे यांनी लावली होती.
- फडके गाणगापूरहून श्रीशैल्यम ला गेले.तेथे रघुनाथ भटाने त्यांची भेट घेतली.
- फडके यांनी दुसरा जाहीरनामा काढून गव्हर्नरला ठार मारणा-यास पाच हजार रु.बक्षीस जाहीर केले होते.

- 23 जुलै 1879 ला विजापूर जवळील देवर नावडगी या गावाच्या बाहेर एका बौध्द विहारामध्ये गाढ झोपेत असताना त्यांना अटक करण्यात आली.
- त्यांच्यावर खटला भरला. उच्च न्यायालयात त्यांचे वकीलपत्र महादेव चिमणाजी आपटे यांनी घेतले. मात्र जन्मठेप.
- 3 जाने 1880 रोजी तेहेरान बोटीने त्यांना येमेनमधील एडन ला पाठविण्यात आले.
- तुरुंगात अनन्वित छळ . पळून जाण्याचा अयशस्वी प्रयत्न
- 17 फेब्रुवारी 1883 रोजी मृत्यू.
- अमृतबझार पत्रिकेने त्यांच्या अटकेनंतर नोव्हेंबर 1879 मध्ये लिहिलेल्या लेखात देशप्रेमाने ओथंबलेला हिमालयासारखा उत्तुंग महापुरुष असा त्यांचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे.

# 1885- 1920

**महाराष्ट्रातील राष्ट्रवादाच्या उदयाची कारणे :**

**1) ऐतिहासिक वारसा :**

छत्रपती शिवाजी महाराजांनी निर्माण केलेल्या स्वराज्याचा वारसा, छत्रपती शिवाजी महाराजांचे शौर्य, लो.टिळकांनी शिवजयंती व गणेशोत्सव साजरा करण्यास केलेली सुरुवात यामुळे मराठी माणसांच्या मनात राष्ट्रवादाची भावना विकसित.

**2) आर्थिक शोषण :**

हस्तव्यवसाय, लघुउदयोग व बलुतेदारी व्यवसायाला उतरती कळा. व्यावसायिक व कारागीर बेकार . दुष्काळातही सक्तीने सारावसूल केल्याने शेतकरी सावकारांच्या पाशात अडकला.

**3) इंग्रजी राजवटीचा परिणाम :**

इंग्रजांमुळे पाश्चात्त्य संस्कृती, साहित्य, शिक्षण, प्रशासन, कायदा, सुधारणावादी विचार इ. संकल्पनांचा संपर्क भारतीयांशी आला. वैचारिक क्रांतीमुळे राष्ट्रवादाची भावना वाढली. समाजसुधारकांचा वर्ग तयार झाला.

**4) इंग्रजी भाषेचा प्रसार :**

1835 मध्ये लॉर्ड विल्यम बेंटिंग याने इंग्रजी भाषेतून शिक्षण देण्याचा कायदा केला. केवळ कारकून तयार करणे हा त्यांचा हेतू असला तरी, आपल्या दृष्टीने इंग्रजी शिक्षण वरदान ठरले. विविध भाषा बोलणा-यांना इंग्रजीने एकत्र आणले.पाश्चात्य साहित्य वाचून त्यांचे प्रागतिक विचार जाणून घेता आले. आधुनिक विचारांचा प्रसार झाला.

**5) दळणवळण व संपर्क प्रगती :**

1853 साली सुरु झालेल्या रेल्वेमुळे तसेच पोस्ट, तारायंत्र यामुळे ब्रिटीशांबरोबरच भारतीयांनाही फायदा झाला. निरनिराळया प्रांतातील जनतेशी संपर्क प्रस्थापित झाला. त्यातून राष्ट्रवादी विचारांची देवाणघेवाण.

**6) महाराष्ट्रातील उठाव :**

उमाजी नाईक, वासुदेव बळवंत, भिल्ल, कोळी यांचे उठाव अयशस्वी झाले तरी, त्यातून महाराष्ट्रात राष्ट्रवादी भावना तेवत राहिली.

**7) मध्यमवर्गाचा उदय :**

सुशिक्षित मध्यमवर्गीयांनी चळवळीच्या माध्यमातून राष्ट्रवादी भावनेला व्यापक स्वरुप दिले.

**8) साहित्य व वृत्तपत्रे यांनी केलेली लोकजागृती :**

लोकहितवादी, चिपळूणकर, गोखले, दादाभाई, म. फुले, न्या.रानडे, लो.टिळक यांनी वृत्तपत्रांच्या माध्यमातून लोकजागृती केली.

## <u>महाराष्ट्रातील विविध संघटना :</u>

**<u>बॉम्बे असोशिएशन:</u>** जगन्नाथ शंकरशेठ. मुंबई. 1852. महाराष्ट्रातील पहिली राजकीय संघटना.

**<u>ईस्ट इंडिया असोशिएशन :</u>** दादाभाई नौरोजी, लंडन.1866 .मंबईत 1869 मध्ये शाखा.

**<u>सार्वजनिक सभा :</u>** ग.वा.जोशी, 1877, पुणे.

**<u>बॉम्बे प्रसिडेन्सी असोशिएशन :</u>** फिरोजशहा मेहता, 1885, मुंबई.

# ***राष्ट्रीय कॉंग्रेस ची स्थापना :***



अॅलन हयुम, लॉर्ड रिपन, नाना शंकरशेठ, दादाभाई, व्योमेशचंद्र बॅनर्जी यांच्या प्रयत्नांतून 28 डिसेंबर 1885 रोजी मुंबईतील गोकुळदास तेजपाल संस्कृत शाळेच्या सभागृहात राष्ट्रीय सभा स्थापन झाली. विविध प्रांतातून 72 प्रतिनिधी हजर. संपूर्ण देशासाठी एक व्यापक चळवळ व व्यासपीठ प्राप्त.

**राष्ट्रीय कॉंग्रेसचे तीन कालखंड**

1) 1885 ते 1905 : मवाळ/नेमस्त कालखंड
2) 1905 ते 1920 : जहाल/टिळक कालखंड
3) 1920 ते 1947 : गांधी युग.

**1) मवाळ कालखंड :**

- सनदशीर राजकारण.इंग्रजांच्या न्यायबुध्दीवर विश्वास, अर्ज विनंत्यांचा कालखंड, शिष्टमंडळे.
- दादाभाई, फिरोजशहा, ना.गोखले, न्या.रानडे,न्या.तेलंग हे मवाळ पुढारी. त्यांच्यासमोर ब्रिटीशांचा आदर्शवाद. ब्रिटीशांच्या न्यायी व उदारमतवादी विचारसरणीवर विश्वास.
- वित्तहानी करुन काहीही साध्य होणार नाही.ब्रिटीशांशी वैर पत्करुन काही उपयोग नाही.

- भारतीय लोकांना राजकीय शिक्षण देऊन राज्यकारभार समर्थपणे सांभाळण्याची पात्रता निर्माण करण्यावर त्यांनी भर दिला.
- मवाळांच्या मागण्यांकडे ब्रिटीशांनी गांभीर्याने पाहिले नाही.
- थोडे दयायचे व बरेच नाकारायचे, अशी नीती.
- मवाळांच्या ब्रिटीशांनी मान्य केलेल्या मागण्या :
- इंडियन कौन्सिल ॲक्ट 1892 हा कायदा मंजूर केला. या कायदयाने केंद्रीय आणि कायदेमंडळातील सदस्यसंख्या वाढली.
- वार्षिक अंदाजपत्रकावर चर्चा करण्याचा अधिकार कायदेमंडळाला दिला.मात्र मताधिकार नाही.
- दादाभाईनी ड्रेन थि✕री मांडून संपत्तीचे इंग्रजांकडून झालेले अपहरण जाहीरपणे विशद केले.
- ना.गोखले यांनी भारतासाठी वसाहतीच्या स्वराज्याची मागणी केली.

**<u>मूल्यमापन :</u>** पूर्णत: अयशस्वी नाही. राष्ट्रीय भावना जागृत ठेवली. आपण एका राष्ट्राचे नागरिक आहोत ही भावना जागृत केली. भारतीयांना राजकीय शिक्षण दिले. ब्रिटीश सरकारची चुकीची धोरणे निदर्शनास आणून दिली.भारतीयांना भारतावर राज्य करण्याचा अधिकार आहे हे जनतेला पटवून दिले.

## 2) लोकमान्य टिळक व जहाल कालखंड :



- नेमस्तांच्या कार्यास अपेक्षित यश मिळत नसल्याने राष्ट्रीय सभेतील तरुणांचा भ्रमनिरास होऊ लागला. ब्रिटीशधार्जिण्या धोरणाचा भारतीय जनतेस काही उपयोग नाही, अशी विचारधारा आकार घेऊ लागली. स्वदेशीचा पुरस्कार करुन परदेशी मालावर बहिष्कार टाकणे, राष्ट्रीय शिक्षणाला प्राधान्य देऊन प्रखर राष्ट्रवाद निर्माण करावा, असे तरुणांना वाटू लागले. त्यातच बंगालची फाळणी झाल्यानंतर तर जहाल मार्गाशिवाय पर्याय नाही, यावर जणू शिक्कामोर्तबच झाले. सनदशीर राजकारण करुनही फाळणीसारखे फळ पदरात पडत असेल, तर कशाला हे असले राजकारण, असा प्रश्न तरुण विचारु लागले. कर्झनच्या काळात त्याने केलेल्या दडपशाहीमुळे तरुणही आक्रमक होऊ लागले. जपानसारख्या लहान राष्ट्राने रशियाचा पराभव केल्यानंतर भारतही ब्रिटीशांचा पराभव करु शकतो, असा आत्मविश्वास तरुणांना वाटू लागला.

***विचारसरणी :***

- प्रतिकार ,
- जन✕ांदोलन,
- नि:शस्त्र संघर्ष,
- स्वदेशीचा पुरस्कार, परदेशी मालावर बहिष्कार
- कॉंग्रेसमध्ये जनसामान्यांना सामील करुन घेणे.
- सरकार नाक दाबल्याशिवाय तोंड उघडणार नाही.
- आपल्या मागण्या मान्य करवून घेण्यासाठी सरकारवर दबाव टाकणे.

## टिळक युग :

- लाल-बाल-पाल. टिळकांसह बिपीनचंद्र पाल आणि लाला लजपतराय असे पुढारी.
- काही वर्षे अरविंद घोष यांचेही योगदान.
- लो.टिळक :
- 1906 च्या कॉंग्रेसच्या कलकत्ता अधिवेशनात स्वराज्य, स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण आणि बहिष्कार अशी चतु:सूत्री मांडून मंजूर करुन घेतली.

- व्हॅलेंटाईन चिरोल यांनी त्यांना भारतीय असंतोषाचे जनक असे संबोधले.
- 1880 मध्ये पुण्यात न्यू इंग्लिश स्कूल स्थापन.
- 1881 मध्ये पुण्यात केसरी आणि मराठा अशी दोन वर्तमानपत्रे सुरु.
- 1884 मध्ये पुण्यात डेक्कन एज्युकेशन सोसायटीची स्थापना.
- 1885 मध्ये पुण्यात फर्ग्युसन कॉलेजची स्थापना.
- 1887 मध्ये आगरकरांशी मतभेद. आगरकर केसरीतून बाहेर .
- 1893 मध्ये पुण्यात सार्वजनिक गणेशोत्सव
- 1895 मध्ये शिवजयंती उत्सव साजरा करण्यास सुरुवात.
- 1898 आणि 1908 मध्ये शिक्षा. 1908 ते 1914 या काळात मंडाले येथे.(गीतारहस्य)
- 1916 पासुन होमरुल चळवळ

**<u>1916 चा लखनौ करार :</u>**

- 1907 च्या सूरत अधिवेशनानंतर कॉंग्रेसमध्ये फूट पडली होती. जहाल व मवाळ यांच्यातील मतभेद मिटवण्यासठी लो.टिळकांनी पुढाकार घेतला.
- पहिल्या महायुध्दात खलिफाच्या प्रश्नावरुन भारतीय मुसलमान दुखावलेले होतेच. त्यामुळे इंग्रज मुस्लीमविरोधी आहेत, असे वाटल्याने मुस्लीमांनाही राष्ट्रीय चळवळ जवळची वाटू लागली.
- लखनौ येथील कॉंग्रेस अधिवेशनात जहाल, मवाळ,मुस्लीम लीग यांनी समझोत्याचा मसुदा तयार करुन तो मंजूर करण्यात आला.

  1) राष्ट्रीय सभेने मुस्लीम लीगच्या वेगळया मतदारसंघाला विरोध करण्याचे सोडून दिले.

  2) मुस्लीम लीग ने ब्रिटीश साम्राज्या✕ांतर्गत स्वराज्याच्या मागणीस मान्यता दिली.

  3) परस्परांमधील मतभेदाचे मुददे बाजूला करुन ब्रिटीश सत्तेविरोधात एकत्र येऊन आंदोलन करण्याची तडजोड केली.

- 1 ऑगस्ट1920 रोजी लो. टिळकांचे निधन झाल्यानंतर राष्ट्रीय कॉंग्रेसमधील टिळक युगाचाही अस्त झाला. टिळकांनंतर कोणी हिकमती जहालवादी नसल्यामुळे व तोपर्यंत राष्ट्रीय राजकारणात म. गांधींचे आगमन झाल्यामुळे जहाल चळवळ मागे पडली. म. गांधींनी राष्ट्रीय कॉंग्रेसच्या माध्यमातून सत्याग्रह या मूलतत्वावर आधारित अहिंसक संघर्षाचा मार्ग स्वीकारला. फिजी बेटे, चंपारण्य , अहमदाबाद आणि खेडा येथे हा प्रयोग यशस्वी ठरल्यानंतर कॉंग्रेसमध्ये म.गांधींचा प्रभाव वाढला आणि टिळकांचे निधन होताच गांधीयुग या नव्या पर्वाला सुरुवात झाली.

# 1920 ते 1947

## सशस्त्र क्रांतीकारक चळवळी :

- इंग्रजांच्या जुलमी दडपशाहीविरोधात मवाळमतवादी धोरण प्रभावी ठरल्यानंतर जहालमतवादी विचारसरणी प्रभावी ठरली.प्रखर क्रांतीकारी तरुणांनी स्वत:च आपला मार्ग शोधला.
- युगांतर य बंगाली साप्ताहिकातील 22 एप्रिल 1906 च्या अंकात क्रांतीकारकांसाठी अरविंद घोष यांचे बंधू बारिंद्रकुमार घोष यांनी तपशीलवार कार्यक्रम सुचवला होता. :
- ब्रिटीश राजवटीविषयी लोकांत द्वेषाची भावना निर्माण करणे.
- तरुणांना शिस्त व शस्त्रे चालवण्याचे प्रशिक्षण देणे.
- शस्त्रे शक्यतो देशातच गुप्तपणे तयार करणे किंवा गरज पडल्यास परदेशातून प्राप्त करणे.
- या कार्यक्रमासाठी लागणारा पैसा श्रीमंतांकडून व लूटमार करुन मिळवणे.
- देशभक्तीपर गीते आणि भारतीय इतिहासातील शूर, वीर नायकांच्या उज्ज्वल पराक्रमाची महती सांगून जनतेत स्वाभिमान निर्माण करणे व त्यायोगे बलिदान करणारी पिढी तयार करणे.

## महाराष्ट्रातील क्रांतीकारक चळवळ :

### चाफेकर बंधूंचे बलिदान :



- 22 जून 1897 ला मध्यरात्री पुण्यातील गणेश खिंडीत प्लेग कमिशनर रॅण्ड, लेफ्टनंट हे गव्हर्नर साहेबांकडील मेजवानी आटोपून घोडागाडीतून परतताना त्यांच्यावर दामोदर हरी चाफेकर आणि बाळकृष्ण हरी चाफेकर यांनी गोळया झाडल्या. द्रविड बंधूंच्या विश्वासघातामुळे आपले दोन भाऊ फाशी गेले म्हणून वासुदेव हरी चाफेकर यांनी द्रविड बंधूंना ठार केले. त्यांनाही फाशी झाली.

### कोल्हापूरचा शिवाजी क्लब

- महाराष्ट्रातील वर्धा व नागपूर येथील आर्य बांधव समाज, पुण्यातला चाफेकर क्लब यांच्यासह कोल्हापूर येथे शिवाजी क्लब निर्माण झाला.
- या क्लबच्या सभासदांनी चाफेकर बंधूंना पकडल्यानंतर युरोपियनांचे खून करणे चांगले, चाफेकरांना तुरुंगातून मुक्त केले पाहिजे, असा प्रचार केला.
- यावेळी या क्लबचे 100 सभासद होते.
- शाहू महाराजांचे अनेक स्नेही अधिकारी देखील या क्लबचे आधारस्तंभ होते.
- 19 फेब्रुवारी 1899 रोजी कोल्हापूरच्या अंबाबाईच्या देवळावर एक पत्रक लटकवलेले आढळले. त्यात म्हटले होते की, तरुणांनो जागे व्हा, शस्त्रे हातात घ्या, ज्यांनी लो. टिळकांना तुरंगात टाकले, त्यांच्याविरोधात ती वापरा.

## बीड चा उठाव

- 1899 ला बीड येथे झालेल्या उठावाचे नेतृत्व सदाशिव नीळकंठ जोशी यांनी केले.
- त्यांनी विविध नावे धारण करुन हा उठाव यशस्वी करण्याचा प्रयत्न केला.
- इंग्रजांविरोधात पैसा उभारण्यासाठी फ्रान्स व रशियाला आपले लोक पाठविण्याचीही तयारी त्यांनी केली होती. मात्र कट उघड झाला.
- उठाव फसल्यानंतर सदाशिव जोशी भूमिगत झाले, ते कायमचेच.

## गुप्त संघटनांची निर्मिती :

- **आर्य बांधव समाज :** वर्धा व नागपूर : श्रीधर परांजपे, बुवा उपाध्ये, अभ्यंकर
- **यवतमाळ येथील गुप्त संघटना** : डॉ.सिध्दनाथ काणे, जनार्दन पुरुषोत्तम वाजणे,
- **अमरावतीतील गुप्त संघटना :** दादासाहेब खापर्डे
- **हैद्राबाद येथील गुप्त संघटना :** नरहरपंत घारपुरे, बोरामणीकर, सातवळेकर .
- **बेळगाव येथील गुप्त संघटना :** गंगांधर देशपांडे (1924)
- **नाशिक येथील मित्रमेळा आणि अभिनव भारत :** 1900 आणि 1904. सावरकर बंधू.

## बॉम्ब तयार करण्याचे प्रशिक्षण :

- कोल्हापूरचे के.डीक़ुलकर्णी बॉम्ब तयार करण्यासाठी जपानला गेले होते.
- सोलापूरचे गोविंद नारायण पोतदार हे देखील बॉम्ब बनवण्याचे शिक्षण घेण्यासाठी जपानला जाऊन आले. त्यांनी माहिम येथे कारखाना काढून अनेकांना बॉम्ब बनविण्याचे तंत्रज्ञान शिकवले.
- सेनापती बापटही बॉम्ब तयार करण्याचे शिक्षण घेण्यासाठी रशियाला जाऊन आले.
- टिळकांच्या अनुमतीने कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर 1902 ते 1904 या कालावधीत नेपाळला वास्तव्य करुन होते.तेथे त्यांनी शिवाजी क्लब चे कार्यकर्ते हणमंतराव कुलकर्णी

यांच्या सहकार्याने बंदुका तयार करण्याचा कारखाना काढण्याचा प्रयत्न केला. मात्र ब्रिटीशांना त्याचा सुगावा लागला. नेपाळच्या पंतप्रधानांच्या मध्यस्थीमुळे खाडिलकर वाचले.

**सिध्दनाथ काणे :**

- यवतमाळच्या टिळकवादी गुप्त मंडळातील सभासद. कलकत्ता येथे वैदयकीय शिक्षण घेताना त्यांचा बारिंदकुमार घोष यांच्या गुप्त संघटनेशी संबंध आला. नरहर भावे, नागपूरचे आबाजी पातूरकर यांच्या सहाय्याने डॉ. काण्यांनी फ्रेंचांच्या ताब्यातील चंद्रनगरहून आठ पिस्तूले, एक बंदूक व बॉम्ब बनविण्याचे साहित्य घेऊन ते यवतमाळला आणले हाते.

**सेनापती बापट :**

- पांडूरंग महादेव बापट हे अहमदनगर जिल्हयातील पारनेर या गावचे.
- मुंबई विदयापीठाची शिष्यवृत्ती घेउन 1904 मध्ये लंडनला गेले.
- माझ्या परतंत्र मातृभूमीला स्वतंत्र करण्यासाठी मी आजपासून यावज्जीव कायावाचामनाने झटेन आणि तिची हाक येताच तिच्या सेवेसाठी धावत येईन, या कामी मला देहाचा होम करावा लागला तरी मी फिरुन याच भारतखंडात जन्म घेईन व अपुरे राहिलेले काम करुन दाखविन. अशी शपथ त्यांनी महाविदयालयात शिक्षण घेत असताना घेतली होती.
- श्यामजी कृष्ण वर्मा यांच्या इंडिया हाऊस चे ते सदस्य बनले.
- श्यामजींच्या प्रयत्नाने बॉम्ब तयार करण्याचे तंत्र शिकण्यासाठी ते पॅरिसला गेले.
- बॉम्ब बनविण्यासंबंधी पुस्तिका त्यांनी भारतात पाठविली होती.
- भारतात परतल्यानंतर त्यांना अटक करण्यात आली. नंतर काही दिवसांनी मुक्त केले.
- 1914 नंतर त्यांनी सशस्त्र क्रांतीचा मार्ग सोडला आणि ते विधायक कार्याकडे वळले.

## स्वा.सावरकर आणि अभिनव भारत संघटना :



- शालेय शिक्षण घेत असताना चाफेकर बंधूंना झालेल्या फाशीचा त्यांच्यावर प्रभाव
- जोसेफ मॅझिनी या इटालियन देशभक्ताचाही प्रभाव. त्याचे चरित्र त्यांनी लिहिले.
- विदयार्थीदेशत मित्रमेळा ही संस्था स्थापन 1900.
- मित्रमेळाचे पुढे 1904 मध्ये अभिनव भारत मध्ये रुपांतर
- त्यांचे बंधू गणेश उर्फ बाबाराव सावरकर यांनी या संस्थांचे कामकाज चालविले.
- परदेशातून शस्त्रे भारतात पाठवून सैनिकांमध्ये ब्रिटीशांविरोधात प्रचार करणे आणि शक्य त्या ठिकाणी गनिमी काव्याने लढा चालविणे, उठावासाठी योग्य संधी शोधणे आणि स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण या कार्यक्रमाद्वारे लोकमत तयार करणे ही अभिनव ची उदिदष्टे होती.
- 1906 साली इंडिया हाऊसची शिवाजी शिष्यवृत्ती मिळवून सावरकर लंडनला.
- तेथे त्यांनी मॅझिनीचे चरित्र आणि इंडियन वॉर ऑफ इंडिपेंडन्स-1857 हा ग्रंथ लिहिला.
- श्यामजी कृष्ण वर्मा यांच्याबरोबर गुप्तपणे बॉम्ब बनवण्याचे कामही चालू ठेवले.
- इंग्लंडमधून भारतात पिस्तूले पाठवले. त्यांनीच पाठवलेल्या पिस्तूलाने अनंत कान्हेरे यांनी कलेक्टर जॅक्सनचा वध केला. मदनलाल धिंग्रा यांनी कर्झन वायलीचा वध केला.
- सावरकरांवर संशय व्यक्त होऊ लागल्यानंतर ते 1910 मध्ये पॅरिस येथे गेले.
- पॅरिसहून लंडनला आल्यानंतर त्यांना पकडण्यात आले.

- मोरिया बोटीने भारतात आणले जाताना मार्सेलिस बंदराजवळ 8 जुलै 1910 रोजी प्रसिध्द उडी.
- नाशिक येथे आणून खटला भरण्यात आला. तेथे त्यांना 25 वर्षे जन्मठेप व काळया पाण्याची शिक्षा सुनावली.
- जॅक्सनच्या खून खटल्यातही त्यांना 25 वर्षे जन्मठेपेची शिक्षा झाली. एकूण 50 वर्षे.

**अनंत कान्हेरे :**

21 डिसेंबर 1909. नाशिक विजयानंद थिएटर, संगीत शारदा नाटक, कलेक्टर जॅक्सनचा वध. त्यानंतर त्यांना पकडून फाशी. नंतर अभिनव च्या संपूर्ण महाराष्ट्रातील कार्यकर्त्यांची धरपकड .

## गांधी युग :



**महात्मा गांधी 1869 ते 1948 :**

- प्राथमिक व माध्यमिक शिक्षण : पोरबंदर
- उच्च शिक्षण : मुंबई.
- बॅरिस्टर : लंडन
- वकीली : मुंबई.
- दादा अब्दुल्ला यांचा खटला लढण्यासाठी द.आफ्रिकेत.

- लि✕ो टॉलस्टॉय यांच्या द किंगडम ऑफ गॉड इज विदिन यू या पुस्तकाचा आणि जॉन रस्किन यांच्या अन टू दि लास्ट या पुस्तकाचा प्रभाव.
- द.आफ्रिकेत टॉलस्टॉय फार्म आणि इंडियन ओपिनियन या वृत्तपत्राची स्थापना.
- द.आफ्रिकत 1906 ते 1914 या काळात अनेक सत्याग्रहांचे यशस्वी नेतृत्व.
- 1915 मध्ये भारतात परत. 25 मे 1915 रोजी साबरमती येथे आश्रम. सेवाग्राम-1936
- त्यानंतर फिजी बेटे, चंपारण्य, अहमदाबाद गिरणी कामगार आणि खेडा साराबंदी अशा यशस्वी आंदोलनांचे नेतृत्व. त्यानंतर राष्ट्रीय राजकारणात प्रभावी नेते म्हणून उदय.

**<u>असहकार चळवळ :</u>**

- 1 ऑगस्ट 1920 रोजी देशात ही अहिंसक चळवळ त्यांनी सुरु केली.
- सप्टे 1920 च्या कलकत्ता अधिवेशनात चळवळीचा आराखडा मांडला.
- 26 डिसेंबर 1920 च्या नागपूर च्या विशेष अधिवेशनात असहकार चळवळीला कॉंग्रेसने मान्यता दिली.

1) अधिकारपदे, पदव्या, मानाच्या जागांचा त्याग
2) सरकारी सभा, कार्यक्रमाला नागरिकांनी हजर राहू नये.
3) सरकारी शाळांच्या ऐवजी राष्ट्रीय शिक्षण संस्थांमध्ये विदयार्थ्यांनी प्रवेश घ्यावा.
4) सरकारी न्यायालयावर बहिष्कार टाकावा. देशी न्यायपंचायतीत जावे.
5) कायदेमंडळाच्या निवडणूकीवर बहिष्कार घालावा.
6) मेसोपोटेमियात पाठवण्यासाठी केल्या जाणा-या मुलकी, लष्करी, नोकर भरतीवर बहिष्कार .
7) परदेशी मालावर बहिष्कार घालावा व स्वदेशीचा पुरस्कार करावा.

**<u>महाराष्ट्रातील असहकार कार्यक्रम :</u>**

- शिवरामपंत परांजपे, काकासाहेब खाडिलकर, गंगाधरराव देशपांडे, वासूकाका जोशी , हरिभाऊ फाटक, चिंतामणराव वैदय हे प्रमुख टिळकवादी अनुयायी म.गांधींचे नेतृत्व मान्य

करुन चळवळीत उतरले. मात्र अण्णासाहेब भोपटकर, बॅ.जयकर, न.चिं.केळकर यांना असहकारिता पटत नसतानाही केवळ कॉंग्रेसच्या प्रतिष्ठेसाठी त्यांनी पाठिंबा दिला.

- कॉंग्रेसने मंजूर केलेल्या ठरावात नमूद न केलेल्या पण म. गांधींना पसंत असणा-या मदयपान निषेध चळवळीने कार्यक्रमास सुरुवात झाली.

**<u>मदयपान निषेध कार्यक्रम :</u>**

- पुणे, ठाणे, धारवाड या भागात जोर .
- त्यानंतर मुंबईतही सुरु. महाराष्ट्रात शांततामय मार्गाने चळवळ सुरु.
- धारवाडचे कलेक्टर पेंटर यांनी 30 जून 1920 रोजी जमावावर गोळीबार केला.
- पेंटरच्या दडपशाहीवर म.गांधींची टीका.
- या चळवळीस धारवाड येथे लागलेले हिंसक वळण लक्षात घेऊन म. गांधींच्या सल्ल्यानुसार मुंबइ कॉंग्रेसने मुंबईतील निदर्शने ऑगस्टपर्यत स्थगित केली.
- या काळात 89 खटले भरुन 60 निदर्शकांना दंड झाला.
- दंड इतके भरावे लागले की, पैशाच्या खर्चाच्या अभावी ही चळवळ थांबवावी लागली.

**<u>न्यायालयांवर बहिष्कार :</u>**

- असहकाराचा कार्यक्रम मान्य झालेल्यांपैकी काहींनी एक वर्षभर वकीली सोडली.
- काही जणांनी नवीन काम हाती घेण्यास नकार दिला.
- भुसावळचे वासुदेवराव दास्ताने, सोलापूरचे रामचंद्र शंकर राजवाडे, सातारचे अष्टपुत्रे, उंबरगावचे नानासाहेब देवधेकर, इ.चा समावेश होता. मात्र ज्यांच्याकडे पूर्वीचेच खटले बरेच होते, त्यांनी ते चालववण्यासाठी न्यायालयात जाणे सोडले नाही. त्यापैकी अण्णासाहेब भोपटकर व बॅ.जयकर हे पुण्यातील अग्रगण्य वकील होते.

**<u>सरकारी शाळा कॉलेजांवर बहिष्कार :</u>**

- सरकारी अनुदानावर/सरकारकडून चालविण्यात येणा-या शाळांवर बहिष्कार .
- राष्ट्रीय शाळा, महाविदयालयांची स्थापना.

- 1920 ला पुण्यात लो.टिळकांच्या नावाने महाविदयालय सरु करण्यात आले.87 विदयार्थी
- काहींनी महाविदयालयीन शिक्षण सोडून नंतर राष्ट्रीय शाळेत अध्यापनाचे काम केले. त्यामध्ये सांगलीचे वि. प्र.लिमये, बा.चि.लागू, महाडचे सखाराम भागवत, मालवणचे कान्होजी इ.होते.

**मध्य प्रांत व व-हाडातील आंदोलन :**

- मध्यप्रांत व व-हाडमधील असहकार आंदोलनात सहभागी झालेले पहिले कॉंग्रेस कार्यकर्ते म्हणजे डॉ.चोळकर . त्यांच्याशिवाय बाबासाहेब परांजपे, वामनराव जोशी यांचाही समावेश होता.

**मुंबईतील साधकाश्रम :**

- 1921 मध्ये बॅ.केशवराव देशपांडे यांच्या नेतृत्वाखाली मुंबई येथील अंधेरीचे आानंदीलाल पोतदार यांच्या वाडयात साधकाश्रम स्थापन करण्यात आला. येथे प्रवेश घेणा-या विदयार्थ्याला मी सरकारी नोकरी करणार नाही, अशी प्रतिज्ञा घ्यावी लागत असे.
- येथे विदयार्थ्यांना शेती, सुतकताई, दुग्धशाळा यासंबंधी शिक्षण दिले जाई.

**मालेगावमधील हिंसक प्रकार :**

- मालेगाव येथे पोलीस उपनिरीक्षकाने असहकार आंदोलनात सहभागी झालेल्या जमावाबाबत अवमानजनक टिप्पण्णी केल्याने जमावाने चिडून त्याला ठार केले.
- असहकाराच्या नावाखाली चाललेल्या या हिंसक घटनेचा महात्मा गांधींनी निषेध केला .

**मुळशी सत्याग्रह :**

- मुळा-मुठा या नदयांच्या संगमावर टाटा कंपनी धरण आणि जलविदयुत प्रकल्प हाती घेणार होती.त्यामुळे 54 गावे पाण्याखाली जाणार हाती.या कंपनीने इंग्रज सरकारबरोबर केलेल्या करारामध्ये या बाबीकडे दुर्लक्ष केले होते.जमीनी गेलेल्या शेतक-यांचा कसलाही विचार करण्यात आलेला नव्हता.

- शंकरराव देव, शिवरामपंत परांजपे, डॉ.फाटक, भोपटकर, तात्यासाहेब केळकर इ.नी हे प्रकरण म.गांधींच्या कानावर घातले.
- गांधीजींनी हे प्रकरण सत्याग्रहाच्या मार्गाने सोडवण्याचे ठरवले.
- शंकरराव देव हे मुळशी सत्याग्रहातील पहिले सत्याग्रही म्हणून ओळखले जातात.
- सेनापती बापट यांनीही या आंदोलनात भाग घेतला.
- 16 एप्रिल 1921 रोजी मुळा नदीच्या पात्रात सत्याग्रहास सुरुवात.
- 12 दिवसांनंतर आंदोलनाला उग्र वळण.
- 1921 ते 24 अशी तीन वर्षे हा सत्याग्रह सुरु होता.
- हजारो सत्याग्रही तुरुंगात डांबण्यात आले.
- सेनापती बापटांना प्रक्षोभक भाषण केल्याप्रकरणी 1 वर्षाची शिक्षा झाली.

**<u>चौरीचौरा प्रकरण :</u>**

- 5 फेब्रुवारी 1922 ला गोरखपूर जिल्हयातील चौरीचौरा येथे निघालेल्या एका मिरवणूकीवर पोलीसांनी गोळीबार केल्याने संतप्त जमावाकडून पोलीस पथकावरच हल्ला.
- एकवीस पोलीस व एक सबइन्स्पेक्टर यांचा मृत्यू.
- म.गांधीनी असहकार आंदोलन तातडीने बंद केले.
- या अनपेक्षित निर्णयामुळे कॉंग्रेस नेते व जनता नाराज झाली.
- सरकारने 10 मार्च 1922 ला राजद्रोहाच्या आरोपाखाली गांधीजींना अटक केली.

**<u>सविनय कायदेभंग चळवळ : 1930</u>**

- म.गांधींनी असहकार आंदोलन बंद केल्याने अनेक नेत्यांच्या मनात नाराजी.
- त्यातूनच 1922 मध्ये स्वराज्य पक्षाची स्थापना घडून आली.

- पुढे राष्ट्रीय सभेवर स्वराज्य पक्षातील नेत्यांचाच प्रभाव राहिला .मात्र स्वराज्य पक्षाचे अध्यक्ष सी.आर .दास यांचा मृत्यू झाल्यानंतर स्वराज्य पक्ष मागे पडला. स्वराज्य पक्षाकडून जनतेचा भ्रमनिरास झाला.
- 1927 साली सायमन कमिशनची नियुक्ती. मात्र त्यात भारतीय सदस्य नसल्याने त्यास विरोध.
- 1928 मध्ये नेहरु रिपोर्ट. त्यास विरोध म्हणून बॅ.जिना यांनी 14 मुददे मांडले.
- 1929 च्या लाहोर कॉंग्रेस अधिवेशनात संपूर्ण स्वराज्याचा ठराव संमत करण्यात आला.या वेळी 26 जाने 1930 हा स्वराज्य दिन म्हणून साजरा करण्याचे ठरले.
- यातूनच सविनय कायदेभंग आंदोलनाची सुरुवात झाली.

**<u>मिठाचा सत्याग्रह :</u>**



- मिठावरील कराचा कायदा मोडण्यासाठी गांधीजींनी आपल्या साबरमती आश्रमातील 79 अनुयायांची पहिली तुकडी सत्याग्रहासाठी निवडली.
- पंडित खरे, गणपतराव गोडसे, विनायकराव, केशव गोविंद हरकारे, अवंतिकाबाई गोखले, जमनालाल बजाज, बाळासाहेब खेर, द.ना.बांदेकर, सक्रा.पाटील इ.महाराष्ट्रीय त्यात होते.
- 12 मार्चला सुरु झालेली दांडी यात्रा 5 एप्रिल रोजी संपली. अंतर : 240 मैल.

- 6 एप्रिल 190 रोजी मिठाचा कायदा मोडला. गांधींजींसह अनेक सहकारी अटक
- त्यानंतर धारासना सत्याग्रहाचे नेतृत्व सरोजिनी नायडू यांनी केले.

**<u>सोलापूरात लष्करी कायदा :</u>**

- सोलापूर येथे 7 मे 1930 रोजी कामगारांनी काम थांबवले. दारुचे अडडे उध्वस्त केले. परदेशी मालाच्या होळया केल्या.जमावाने मंगळवार पेठेतील मुख्य पोलीस चौकीवर हल्ला चढवून पोलीस शिपायास बेदम मारहाण केली.त्यात एक शिपाई मरण पावला.एक शिपाई जिवंत जाळण्यात आला.
- न्यायालयाची इमारतही पेटवण्यात आली.
- परिस्थिती आटोक्यात आणण्यासाठी लष्करी कायदयाबाबतचा अधिकृत वटहूकूम 15 मे रोजी काढण्यात आला.
- संपूर्ण भारतात सोलापूर येथे लष्करी कायदा होता.
- पोलीसांच्या खूनाला जबाबदार असल्याच्या आरोपावरुन मलाप्पा धनशेटटी, कुर्बान हुसेन, जगन्नाथ शिंदे आणि श्रीकिसन सारडा यांना पकडण्यात आले. त्यांना 12 जाने 1931 रोजी येरवडयाच्या तुरुंगात फाशी देण्यात आले. हा दिवस सोलापूर मध्ये हुतात्मा दिन म्हणून पाळला जातो.



- सोलापूर नगरपालिकेवर तिरंगा झेंडा लावल्यानंतर इंग्रजांनी दडपशाही सुरु केली. सोलापूर भागात गांधी टोपी हे एक प्रभावी प्रतीक होते.

- सोलापूर कॉंग्रेस समितीचे चिटणीस तुळशीदास जाधव यांनी गांधी टोपी काढण्याचे नाकारल्यानंतर त्यांना मारहाण करण्यात आली.

**<u>शिरोडा सत्याग्रह :</u>**

- विलेपार्ले येथील छावण्यांतून सत्याग्रहांच्या तुकडया बोटीने वेंगुर्ल्यास पाठवल्या जात होत्या. वेंगुर्ल्यास उतरुन सत्याग्रहींनी शिरोडयास पायी चालत जायचे आणि 12 मे रोजी सत्याग्रहास सुरुवात करायची असे ठरले होते.
- मात्र त्यापूर्वीच शंकरराव देव, आप्पासाहेब पटवर्धन, वासुदेवराव दास्ताने, ग. वि. केतकर, भाउ रानडे, नाथ घाणेकर इ. ना पकडण्यात आले. त्यामुळे सत्याग्रहाची सूत्रे डॉ. वा. वि. आठल्ये, आचार्य शं. दा. जावडेकर, विनायकराव भुस्कुटे यांनी हाती घेतली. एकूण 583 स्वयंसेवक शिरोडयास सत्याग्रह करण्यासाठी आले होते. 12 मे ला सत्याग्रह सुरु झाला. 15 मे ला पोलीसांनी स्वयंसेवकांना मारहाण केली. सत्याग्रह थांबविण्यात आला.

**<u>वडाळा मिठागारावरील छापा :</u>**

- मुंबई प्रदेश कॉंग्रेसच्या वतीने वडाळा येथील मिठागारावर सत्याग्रह करण्याचा कार्यक्रम ठरवण्यात आला. 17 मे 1930 रोजी सत्याग्रहीना पोलीसांनी पकडले. 1 जून पर्यंत ही कारवाई सुरु होती.

**<u>खानदेशचा सत्याग्रह :</u>**

- पूर्व आणि पश्चिम खानदेशातील जिल्हयांनीही या सत्याग्रह मोहिमेत भाग घेतला.
- पूर्व खानदेशात 175 व पश्चिम खानदेशातून 424 स्वयंसेवकांनी सत्याग्रहात भाग घेतला.

**<u>सातारा जिल्हयातील सत्याग्रह :</u>**

- सातारा जिल्हयात बिळाशी गावात जंगल सत्याग्रहात स्त्री पुरुषांनी शौर्य गाजवले.
- तेथे शेतक-यांनी कायदेभंग करुन जंगलातून एक झाड आणून ते भर चौकात ठेऊन त्याच्यावर तसेच देवळावर राष्ट्रध्वज फडकावला.

- 5 सप्टेंबर 1930 रोजी बिळाशी येथे शिरुन पोलीसांनी तो झेंडा ताब्यात घेण्याचा प्रयत्न केला. त्यावेळी राजूताई कदम या स्त्री ला लाठीचा मार खावा लागला. 39 जणांना पोलीसांनी पकडले.
- क्रांतीसिंह नाना पाटील यांनी आपल्या भाषणांनी जागृती घडवून आणली.

**<u>ठाणे सत्याग्रह :</u>**

- ठाणे जिल्हयातील उंबरगाव येथे 5 मे ला मिठाच्या सत्याग्रहाचे नेतृत्व नानासाहेब देवधेकर आणि कमलादेवी चटटोपाध्याय यांनी केले. मिरवणूकीतील दहा हजार लोक हातात पाण्याची मडकी घेउन समुद्र किना-यांकडे गेली होती.डहाणू, चिंचणी बोर्डी या ठिकाणी मिरवणूका काढून लोकांनी मिठाचा कायदा मोडला. येथील शामराव पाटील हे दांडी यात्रेतही सहभागी झाले होते.

**<u>चिरनेर सत्याग्रह :</u>**

25 सप्टे 1930 ला पनवेलजवळील चिरनेर गावातील शेतक-यांनी मोर्चा काढला. त्यावेळी पोलीसांनी केलेल्या गोळीबारात 7 सत्याग्रही मारले गेले.नंतर झालेल्या संघर्षात मामलेदार, तीन पोलीस आणि एक वनसंरक्षक असे चौघे ठार झाले. 47 जणांवर खटला भरण्यात आला.केशव गुप्ते, प्रभाकर रास्ते, वसंत बेदक, नारायण धोंडो खरे, त्रिंबक बेडेकर, इ.11 जणांवर खटले भरण्यात आले.

**<u>बाबू गेणू :</u>**

- आंबेगाव तालुक्यातील महांडूळे पडवळ या गावचा मूळ रहिवासी असलेल्या बाबू गेणू याने सत्याग्रहात कॉंग्रेसचा स्वयंसेवक म्हणून सहभाग घेतला होता.
- 12 डिसेंबर 1930 रोजी मुंबई शहरात परदेशी कापडाने भरलेला एक ट्रक आडवण्याच्या प्रयत्नात तो ट्रकसमोर आडवा झाला. ट्रक अंगावरुन गेल्यामुळे मृत्यू.
- त्यानंतर प्रक्षुब्ध जमावाने जी.टी. हॉस्पिटल च्या इमारतीवर असलेला युनियन जॅक जाळून टाकला.पोलीस पथकावरही हल्ला केला.

- बाबू गेणूच्या बलिदानाने महाराष्ट्रातील अनेक तरुणांना प्रेरणा मिळाली.

**दहीहंडा सत्याग्रह :**

- अकोला जिल्हयातील दहीहंडा गावामध्ये खा-या पाण्याच्या विहिरी असल्याने तेथे मीठ तयार करुन कायदेभंग करण्याची योजना
- मुळशी सत्याग्रहातील क्रांतीकारक नेते श्री. बापूसाहेब सहस्त्रबुध्दे यांच्या नेतृत्वाखाली विहिरीमधून पाणी काढून मीठ बनवण्यात आले.त्यामुळे कायदेभंग झाला.
- वर्धा जिल्हयातून शेकडो कार्यकर्ते दहीहंडयाला गेले.
- नागपूर येथे 13 एप्रिल 1930 ला नरकेसरी अभ्यंकरांनी जाहीर सभा घेऊन तिथे मिठाच्या पुडयांचा जाहीर लिलाव करण्यात आला.
- यवतमाळ येथे लोकनायक बापूजी अणे यांनी मिठाच्या पुडयांचा लिलाव केला.
- अकोला जिल्हयात दुर्गाताई जोशी, दादासाहेब गोळे, ब्रिजलाल बियाणी, यांनी कायदेभंग चळवळ राबविली.
- बुलढाणा जिल्हयातही गावोगावी कायदेभंग करुन आणलेल्या अवैध मिठाची विक्री होऊ लागली.
- अमरावती येथेही कायदेभंग.डॉ.भोजराव देशपांडे, डॉ.पातूरकर मोरे, इ.चा सक्रिय सहभाग.

**पुसदचा जंगल सत्याग्रह :**

- पुसद च्या आरक्षित जंगलातील गवत 10 जुलै 1930 ला कापून बापूजी अणे यांच्या नेतृत्वाखाली 11 स्वयंसेवकांनी कायदा मोडला.
- अणे यांना सहा महिन्यांची शिक्षा.
- 11 जुलै ला डॉ.मुंजे यांनीही असाच सत्याग्रह केला.त्यांनाही शिक्षा.

- पुढे दुस-या गोलमेज परिषदेत म.गांधींनी सहभागी व्हावे यासाठी लॉर्ड आयर्विन यांनी म. गांधींबरोबर करार केला. या करारानुसार सविनय कायदेभंग चळवळ स्थगित करण्यात आली. दुस-या गोलमेज परिषदेत उपस्थित राहूनही म. गांधींना अभिप्रेत असलेल्या

मागण्या मान्य न झाल्याने त्यांनी पुन्हा सविनय कायदेभंगाची हाक दिली. दरम्यान रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनी 16 ऑगस्ट 1932 रोजी जातीय निवाडा जाहीर करुन अस्पृश्यांनाही स्वतंत्र मतदारसंघ बहाल केले. म.गांधींना ही इंग्रजांची हिंदुंमध्ये फूट पाडण्याची रणनिती वाटली. त्यामुळे त्याविरोधात येरवडा येथील तुरुंगात उपोषण सुरु केले. अखेर 25 सप्टेंबर 1932 रोजी गांधी-आंबेडकर यांच्यात पुणे करार होऊन अस्पृश्यांसाठी स्वतंत्र मतदारसंघाऐवजी 148 राखीव जागा ठेवण्यास सहमती झाली.

- हळूहळू सविनय कायदेभंग चळवळीतील जोरही ओसरला.
- त्यानंतर 1933 पासून म.गांधींनी अस्पृश्यांच्या उध्दारासाठी कार्य करण्यास प्राधान्य दिले.

# छोडो भारत आंदोलन



**पार्श्वभूमी :**

- 1935 च्या कायदयाअन्वये 1937 साली निवडणूका. प्रांतिक सरकारे स्थापन.
- 1939 ला सुरु झालेल्या दुस-या महायुध्दात भारत इंग्लंडच्या बाजूने युध्दात उतरत असल्याचे लॉर्ड लिनलिथगो यांनी परस्पर जाहीर करुन टाकल्याने कॉंग्रेस सरकारांचे राजीनामे.

- पुढे 8 ऑगस्ट 1940 ला ऑगस्ट घोषणा करुन हिंदुस्थानला वसाहतीचे स्वराज्य देणे हे इंग्लंडचे धोरण राहील, अशी घोषणा केली.
- मात्र पूर्ण स्वातंत्रयाची मागणी डावलल्यामुळे कॉंग्रेसने युध्दकाळातही आंदोलन सुरुच ठेवले.
- 15 व 16 सप्टेबर 1940 रोजी मुंबईत कॉंग्रेस समितीची बैठक होऊन वैयक्तिक सत्याग्रह कार्यक्रम आखण्याचे म.गांधीनी जाहीर केले.
- 13 ऑक्टोबर 1940 च्या वर्धा बैठकीत विनोबा भावे पहिले वैयक्तिक सत्याग्रही निवडले गेले.
- मात्र युध्दात जपानने मुसंडी मारल्यानंतर इंग्रजांच्या पराभवाची शक्यता निर्माण होऊ लागली. इंग्रजांच्या पराभवातून भारताला स्वातंत्र नको होते, व जपानच्या विजयामुळे कदाचित ते मिळालेच नसते. म्हणून गांधीजींनी चळवळ बंद केली.
- त्यानंतर अमेरिकन प्रेसिडेंट रुझवेल्ट च्या दबावामुळे इंग्लिश पंतप्रधान चर्चिल यांनी क्रिप्स मिशन भारतात पाठवले.मात्र या मिशनने जाहीर केलेल्या शिफारसींमध्ये केवळ जर-तर ची भाषा असल्याने भारतातील सर्वच पक्षांनी ही योजना फेटाळली.
- इंग्रज आपल्याला मूर्ख बनवत असल्याचे लक्षात घेऊन एक व्यापक चळवळ उभारण्याची कॉंग्रेस पक्षाने योजना आखली.

## छोडो भारत आंदोलन सुरु :

- 8 ऑगस्ट 1942 रोजी कॉंग्रेसच्या मुंबई अधिवेशनात छोडो भारत अथवा चले जाव चा ठराव मांडण्यात येऊन मंजूर करुन घेण्यात आला.
- 9 ऑगस्ट 1942 रोजी म. गांधी, पं. नेहरु यांच्यासह कॉंग्रेसच्या सर्वच महत्वाच्या पुढा-यांना अटक.
- भारतीय जनतेने त्यांना जमेल त्या पध्दतीने छोडो भारत चळवळ संपूर्ण देशभर सुरु केली.
- दडपशाहीमुळे या चळवळीला भूमिगत आंदोलनाचे रुप मिळाले.

**<u>मुंबईतील आंदोलन :</u>**

- मुंबई हे क्रांतीचे प्रमुख केंद्र होते.
- अरुणा असफ अली, अच्युतराव व रावसाहेब पटवर्धन, डॉ. राममनोहर लोहिया, अण्णासाहेब सहस्त्रबुध्दे, साने गुरुजी, एस.एम.जोशी, ना.ग.गोरे, शिरुभाऊ लिमये इ. नेते भूमिगत झाले.
- सेंट्रल डायरेक्टोरेट ही भूमिगतांची मध्यवर्ती संस्था मुंबईत सुरु झाली.तेथूनच शस्त्रास्त्रांचा पुरवठा.
- महाविदयालये बंद पाडण्यात आली.अनेक ठिकाणी स्फोट झाले.
- बॉम्ब प्रकरणातील संशयित म्हणून डॉ. वसंत अवसरे यांना अटक करण्याचा प्रयत्न केल्यानंतर ते भूमिगत झाले.
- मुंबईतील नळ बाजारातील इमारतीत छापा टाकून एस.एम.जोशी, महादेव कारेकर, मधु लिमये, विनायक कुळकर्णी यांना कैद.
- उषा मेहता, विठठल जव्हेरी, चंद्रकांत जव्हेरी यांनी मुंबईत गुप्त रेडिओ केंद्र सुरु केले.

**<u>रायगड जिल्हा चळवळ :</u>**

- नाना पुरोहित, मोहन धारिया यांनी रायगड जिल्हयातील महाड येथे ही चळवळ कार्यरत ठेवली.
- पोस्टातील कागदपत्रे जाळणे, तारायंत्रे तोडणे, पोलीसांकडील बंदुका काढून घेणे असे कार्यक्रम.
- नेरळ, माथेरान परिसरात भाई कोतवाल यांनी कार्यकर्त्यांना संघटित करुन शेतक-यांची सशस्त्र सेना उभारली.
- टाटांच्या खोपोली येथील विदयुत केंद्रातून मुंबईला होणारा वीजपुरवठा खंडित करण्यात आला.
- भाई कोतवाल व त्यांचे सहकारी गोमाजी पाटील यांना पकडून देणा-यांना पाच हजारांचे इनाम जाहीर केले होते.

## पश्चिम महाराष्ट्रातील चळवळ :

- पुण्यातील वेस्टएंड आणि कॅपिटल या दोन चित्रपटगृहांत बॉम्बस्फोट घडवून आणले होते.
- नाशिक येथे पोस्ट ऑफिस ची लूट.
- सातारा येथे नाना पाटील यांचे पत्रीसरकार .
- तुफान सेना आणि नागनाथअण्णा नायकवडी यांच्या आझाद दल या गटाने सातारा, सांगली परिसरात सशस्त्र कारवाया केल्या.

## प्रती सरकार :



- क्रांतीसिंह नाना पाटील यांनी सातारा विभागात समांतर सरकार स्थापन केले. त्याला प्रतिसरकार म्हटले जात असे. याला पत्रीसरकार असेही नाव होते, कारण इंग्रज अधिकारी अथवा कर्मचारी यांना पकडून त्यांच्या पायात लोखंडी पत्री ठोकली जात असे.
- 1 ऑगस्ट 1942 ते 21 मे 1943 या चलजाव च्या पहिल्या टप्प्यात मोर्चे, निदर्शने, आणि भूमिगत राहून घातपाताचे प्रकार घडवून आणले गेले.
- या काळात यशवंतराव चव्हाण, डी.जी.देशपांडे, दिनकरराव निकम, तानाजी पेंढारकर इ. व्यक्तींचे योगदानही महत्वपूर्ण.

**पुण्यातील चळवळ :**

- केशवराव जेधे, धनंजयराव गाडगीळ, शंकरराव देव इ. प्रमुख नेत्यांना अटक केल्याने त्याचा निषेध करण्यासाठी प्रचंड आंदोलन झाले.
- 1 ऑगस्ट 1943 चा पुण्यातील मोर्चा हॅमंड या अधिका-याने अडवून त्यावर गोळीबार केला.
- त्यामध्ये नारायण दाभाडे यांचा मृत्यू.

**खानदेशातील चळवळ :**

- सानेगुरुजी खानदेशातील असूनही त्यावेळी पुण्यातील भूमिगत चळवळीत सक्रिय होते.
- त्यांच्याच सल्ल्याने अंमळनेर येथील उत्तमराव पाटील, लीलाताई पाटील, शिवाजीपाटील, दशरथ पाटील यांनी चळवळ उभारली.
- टपाल कचेरी, रेल्वेस्टेशन, न्यायालय पेटवून देण्यात आले.
- पोलीसांच्या गोळीबारात महादेव देसाई यांचा बळी.
- धुळे नंदुरबार रस्त्यावरील चिमठाणे गावाजवळ साडेपाच लाखांचा सरकारी खजिना क्रांतीकारकांनी लुटला. अब्दुल रज्जवा याच्याशी संगनमत करुन जनतेने रेल्वे उलथून टाकल्या.
- नंदुरबार येथे शिरीषकुमार मेहता या विदयार्थ्याने शाळेच्या इमारतीवर तिरंगा फडकावल्यामुळे त्यालाही शहीद व्हावे लागले.

**विदर्भातील चळवळ :**

- 13 एप्रिल 1939 रोजी मदनलाल बागडी, विनायक सखाराम दांडेकर आणि शाम नारायण काश्मीरी यांनी स्थापन केलेल्या हिंदुस्थान लाल सेनेने भगतसिंग, राजगुरु, सुखदेव, चंद्रशेखर आझाद यांच्या हिंदुस्थान सोशालिस्ट रिपब्लीकन आर्मी या गुप्त संघटनेचा कित्ता गिरवण्याचे ठरवले होते.
- विदर्भातील 55 कार्यकर्त्यांनी घराबाहेर पडून भूमिगत व्हावे अशा सूचना मदनलाल बागडींनी दिल्या होत्या.

- ऑगस्ट 1942 मध्ये अमरावतीतील चिटणीस पार्क मध्ये जाहीर सभा आयोजित करण्यात आली होती.
- या सभेत राष्ट्रसंत तुकडोजी महाराज यांनी देशभक्तीपर गीते गाऊन जनतेच्या मनात अंगात फुलवला. तुकडोजी महाराजांना अटक.
- या घटनेचे पडसाद नागपूरात उमटून हिंसक आंदोलन सुरु झाले.
- राष्ट्रीय शिवाजी मंडळाचे कार्यकर्ते दाजीबा महाले पोलीस गोळीबारात मरण पावले. त्यांच्या शंकर महाले या 18 वर्षाच्या मुलानेही म. गांधींचा जयजयकार करत मृत्यूला कवटाळले.
- अकोला येथील राष्ट्रीय शाळेचे शिक्षक आणि विदयार्थी तसेच अमरावतीच्या हनुमान व्यायाम मंडळाचे कार्यकर्ते हे चलेजाव चळवळीत सहभागी होते.

**राष्ट्रसंत तुकडोजी महाराज :**



- जन्म : यावली 1909.माणिक बंडूजी ब्रम्हभट
- मोझरी यथे गुरुकुंज आश्रम.
- 1930 च्या सविनय कायदेभंग चळवळीपासूनच कीर्तन, भजन, प्रवचन या माध्यमातून लोकप्रबोधन.
- हिंदी व मराठी काव्याच्या माध्यमातून देशप्रेमाचा संदेश.

- पत्थर सारे बॉम्ब बनेंगे, भक्त बनेंगे सेना अशा गीतांनी  तरुणांमध्ये क्रांतीची ज्योत पेटविली.
- नागपूर, आष्टी, चिमूर या गावात चिथावणी देण्याच्या आरोपावरुन त्यांना अटक.
- यावली या गावातील ग्रामस्थांमध्ये आणि कलेक्टर मेल्ड्रम यांच्यात संघर्ष.
- स्वातंत्र्यानंतर  भारताचे राष्ट्रपती डॉ.राजेंद्रप्रसाद यांनी  तुकडोजी महाराजांना राष्ट्रसंत ही उपाधी दिली.

**<u>बेनोडा गावाची शौर्यगाथा</u>**

- मोर्शी-वरुड रस्त्यावर बनोडा हे गाव वसलेले आहे. 16 ऑगस्टला बेनोडा, इत्तमगाव, लोणी इ.खेडयातील लोकांनी एकत्र येऊन पोलीस ठाण्यावर मोर्चा नेला.
- वामनराव पाटील यांनी नेतृत्व केले.
- मोर्चावर पोलीसांना बेछूट गोळीबार केला. त्यात महादेव फंदाडे, महादेव वाघमारे, पांडूरंग मालपे, महादेव बारमासे, विनायक यावले या सहा जणांनी प्राणाहूती दिली.

**<u>आष्टी आणि चिमूर चे लढे :</u>**

- वर्धा जिल्हयातील आष्टी गावी 16 ऑगस्टला 3000 लोकांचा जमाव पोलीस ठाण्यावर चाल करुन गेला. तेव्हा पोलीसांनी केलेल्या गोळीबारात सातजण ठार झाले.
- संतप्त जमावानेपोलीसांवर हल्ला करुन पाच पोलीस मारले.
- सरकारी कार्यालये जाळून टाकण्यात आली.
- चिमूर(चंद्रपुर जिल्हा) या गावातही संतप्त जमावाने  प्रांताधिकारी, नायब तहसीलदार, परिमंडल निरीक्षक व एक शिपाई यांना लाठयांचे प्रहार करुन ठार केले.  सरकारी इमारती जाळण्यात आल्या.
- त्यास प्रत्युत्तर म्हणून इंग्रजांनी नंतर या गावातील बायका-मुलांवर अत्याचार केले.

**भन्साळींचे उपोषण :**

- सेवाग्राम आश्रमातील प्रा.भन्साळी यांनी 1 नोव्हेंबर 1942 रोजी दिल्लीतील बापूजी अणे यांची भेट घेऊन चिमूरच्या महिलांना न्याय मिळवून दयावा, असा प्रयत्न केला.
- मात्र या प्रकरणात काहीच कारवाई होत नाही, हे पाहून उपोषणास प्रारंभ केला.परंतु त्याचा फारसा उपयोग झाला नाही.
- भन्साळींनी या प्रकरणी 63 दिवस उपोषण केले.
- ठक्कर बाप्पा नटेश, अप्पाजी द्रविड, ए.डी.मणी, पी.कोदंडराव इ.नी पत्रक काढून चिमूर प्रकरणाची न्यायालयीन चौकशी व्हावी असा आग्रह धरला.
- 6 जाने 1943 रोजी देशातील शंभरहून अधिक वृत्तपत्रांनी एक दिवसाचा हरताळ पाळला.

**मराठवाडा विभाग :**

- स्वामी रामानंद तीर्थ यांनी गांधीजींच्या आदेशानुसार हैद्राबाद संस्थानात चळवळ उभी करण्याचे ठरवले.मात्र त्यांना 9 ऑगस्ट 1942 रोजीच हैद्राबादच्या नामपल्ली स्टेशनवर उतरताच अटक करण्यात आली. 16 डिसेंबर 1943 पर्यंत ते जेलमध्ये होते.
- अच्युत देशपांडे, माणिकचंद पहाडे, गुलाबचंद नागोरी, गोपाळशास्त्री देव, मोतीलाल मंत्री, आर .डी.देशपांडे यांच्याबरोबर अंबाजोगाईच्या नूतन विदयालयाचे रामचंद्र गोविंद परांजपे व नारायणराव जोशी यांनी चळवळ उभारली.

**मोडतोडीच्या घटना :**

- 1942 च्या आंदोलनात डिसेंबर 1942 मध्ये मोमीनाबाद (अंबाजोगाई) गावात सरकारी प्रचारासाठी ठेवलेला रेडि ओ आणि दोन टपाल पेटया पळवण्यात आल्या.
- याच गावातील नूतन विदयालय, सरकारी शाळा, योगेश्वरीमंदीर अशा ठिकाणी ब्रिटीश साम्राज्याच्या विरोधात घोषणा लिलिलेली पोस्टर्स चिटकवण्यात आली.
- योगेश्वरी नूतन विदयालयाच्या 14 शिक्षकांविरोधात प्रतिबंधात्मक आदेश
- हैद्राबाद संस्थानात मोडतोडीच्या एकूण 13 घटना मराठवाडयात घडल्या.

- मराठवाडयातून वरील लोकांशिवाय राघवेंद्र दिवाण लातूर, अण्णासाहेब वाळूंजकर, अच्युत देशपांडे, तात्यासाहेब महाजन, रामगोपाल नावंदर, नागोराव पाठक, ज. प. मुळे (औरंगाबाद), हिरालाल कोटेचा, मोतीलाल मंत्री (बीड), व्यं. बा. जोशी, देवरामजी चव्हाण(उस्मानाबाद), अच्युतराव खोडवे(हिंगोली), इ.ना अटक करण्यात आली.

छोडो भारत चळवळ देशाला स्वातत्रय मिळवून देऊ शकली नाही, मात्र ते दृष्टीपथात आणून ठेवले. छोडो भारत चळवळीत झालेल्या हिंसेबाबत इंग्रज सरकारने गांधीजींनाच दोषी ठरवले. म्हणून गांधीजींनी 21 दिवसांचे उपोषण केले.

पुढे इंग्लंडमधील सत्ताबदल, इतर देशांचा दबाव, भारतातील लढा, वेव्हेल, कॅबिनेट, माउंटबॅटन योजना या माध्यमातून भारताची स्वातंत्रयाकडे वाटचाल सुरु झाली. मात्र त्याचवेळी मुस्लीम लीग च्या हटवादी धोरणामुळे देशाची फाळणी होणार हे देखील स्पष्ट होऊ लागले. मुस्लीम लीग च्या हिंसेमुळे व जिनांच्या हटटामुळे देशाची फाळणी झाली. देश 15 ऑगस्ट ला स्वतंत्र झाला, मात्र फाळणीची भळभळणारी जखम घेऊनच..........

# महाराष्ट्रातील समतेच्या चळवळी

## अ) महाराष्ट्रातील कामगार चळवळ :

- युरोपातील औदयोगिक क्रांतीचा परिणाम भारतीय भूप्रदेशावरही झाला. ब्रिटीशांनी स्वत:च्या गरजेसाठी भारतात उदयोग व कारखाने सुरु केले.कारखानदारीचा विकास झाला.
- 1853 मध्ये आगगाडी निर्मितीचा पहिला कारखाना सुरु झाला.
- 11 जुलै 1851 रोजी भारतात पहिली भारतीय मालकीची कापड गिरणी मुंबई(कुर्ला) येथे नानाभाई कावसजी दावर यांनी सुरु केली.
- टाटा यांनी नागपूर येथे एम्प्रेस मिल ची स्थापना केली.

### कामगारांच्या समस्या :

1) कमी मजूरी
2) सुटटया , रजा नाही.
3) कारखान्यात मूलभूत सुविधांचीही कमतरता.
4) संरक्षण नसल्याने अन्यायाविरोधात आवाज उठवता येत नव्हता.

### कामगार चळवळीचा उदय :

- 23 मार्च 1875 रोजी ब्रिटीश शासनाने मुंबईचे जिल्हाधिकारी अर्बुट नॉट यांच्या अध्यक्षतेखाली पहिले फॅक्टरी कमिशन नियुक्त करण्यात आले. मात्र त्यांच्या अहवालाला सरकारने मंजूरी दिली नाही.
- सोराबजी शापूरजी बेंगाली यांच्या नेतृत्वाखाली इस्. 1875 मध्ये कामगारांची स्थिती सुधारण्यासाठी कायदा करावा अशी मागणी करण्यात आली.
- याच काळात मंदी आल्यामुळे कामगारांचे प्रचंड हाल.

- वृत्तपत्रांमधून फॅक्टरी ॲक्ट विषयी विचार मांडून जनजागृती झाल्यामुळे सरकारवरील दबाव वाढला.
- त्यामुळे सरकारने 1881 मध्ये पहिला फॅक्टरी ॲक्ट मंजूर केला.
- गिरणी मालकांच्या दबावामुळे यातील तरतूदी सौम्य व मर्यादित स्वरुपाच्या असल्याने कामगारांमध्ये असंतोष पसरला.
- यातून मुंबईमध्ये कामगार चळवळीचा उदय झाला.

## **कामगार चळवळीचे जनक : नारायण मेघाजी लोखंडे**

- जन्म: 1848, ठाणे
- 1870 पासून सामाजिक कार्याला सुरुवात.
- दीनबंधू वृत्तपत्रातून कामगारांचे प्रश्न, दु:ख मांडण्याचा प्रयत्न केला.
- बॉम्बे मिल ओनर्स असो.ही संघटना कोणतेही नियम पाळत नसल्याने त्यांनीच कामगारांचे प्रश्न हाती घेतले.
- सरकारने 1881 साली पास केलेल्या फॅक्टरी ॲक्टमधील तरतूदींबाबत श्री.लोखंडे यांनी टीका केली.
- कामगारांच्या हितासाठी त्यांनी 1884 साली बॉम्बे मिल हॅण्ड असोशिएशन ही देशातील पहिली कामगार संघटना स्थापन केली.
- 23 सप्टे 1884 रोजी कामगारांची पहिली सभा मुंबईतील परळ येथे घेतली.त्यावेळी चार हजार कामगार हजर होते.
- 24 एप्रिल 1890 रोजी महालक्ष्मी रेस कोर्स मैदानावर 10 हजार कामगारांची सभा झाली. यावेळी कामगारांनी सुटटीची मागणी केली.
- 10 जून 1890 रोजी गिरणी मालकांनी रविवारच्या सुटीला मान्यता दिली. हा कामगार चळवळीचा मोठा विजय मानला जातो.
- ना. मे. लोखंडे यांनी हिंदु-मुस्लीम दंग्याच्या वेळी केलेल्या कार्यामुळे ब्रिटीश सरकारने त्यांना रावबहादूर हा किताब दिला.

- त्यांना जस्टीस ऑफ पीस या किताबानेही सन्मानित करण्यात आले होते.
- प्लेगच्या आजाराने त्यांचे 1897 मध्ये श्री.नारायण लोखंडे यांचे निधन झाले.

**<u>स्वातंत्र्यपूर्व काळातील इतर कामगार चळवळी :</u>**

- 1907 मध्ये बॉम्बे पोस्टल युनियन ही पोस्ट खात्यातील कामगारांची संघटना.
- 1909 मध्ये कामगार हितवर्धक सभा : भिवाजी नरे, सीतारा बोले व हरिश्चंद्र तालचेरकर
- 1909 मध्ये सोशल सर्व्हिस लीग : ना.म.जोशी, गोपाळ देवधर, नरेश द्रविड
- 1918 मध्ये मद्रास लेबर युनियन : बी.पी.वाडिया.
- 1920 मध्ये मजूर महाजन संस्था
- 1920 मध्ये ऑल इंडिया ट्रेड युनियन कॉंग्रेस ( अखिल भारतीय कामगार महासभा) : संस्थापक : ना.म.जोशी, पहिले अध्यक्ष : लाला लजपतराय
- 1931 : मध्य प्रांत व-हाड विडी कामगार संघ : एल.एन.हरदास
- 1937 : संयुक्त खानदेश मजूर फेडरेशन
- 1938 : राष्ट्रीय कामगार संघटना संघ
- 1936 : स्वतंत्र मजूर पक्ष : डॉ.आंबेडकर

11 एप्रिल 1939 रोजी मुंबई शहरातील ब्रिटीया गिरणीचा 7 महिने संप श्रीपाद अमृत डांगे यांच्या नेतृत्वाखाली झाला. मालकांनी मागण्या मान्य केल्यामुळे संप मागे घेण्यात आला.

**<u>स्वातंत्र्योत्तर काळातील कामगार चळवळ :</u>**

- सरदार वल्लभभाई पटेल यांच्या नेतृत्वाखाली मुंबई येथे इंडियन नॅशनल ट्रेड युनियन कॉंग्रेस (इंटक) ची स्थापना.
- या संघटनेला शह देण्यासाठी समाजवादयांनी 1948 मध्ये हिंदू मजदूर सभा स्थापन केली.
- 14 जाने 1959 रोजी समितीच्या नेत्यांच्या बैठकीत मुंबईतील सर्व गिरणी कामगारांची एक युनियन स्थापन करण्याचा निर्णय. मुंबई गिरणी कामगार युनियन असे नाव.

- कामगार आघाडी ( दत्ता सामंत)
- महाराष्ट्र लेबर युनियन( राजन नायर)

## फॅक्टरी अॅक्ट

### 1) 1881 चा फॅक्टरी अॅक्ट :

- अत्यंत सौम्य व मर्यादित.
- 100 पेक्षा जास्त कामगार असणा-या गिरणीला लागू
- 7 ते 12 या वयोगटातील मुलांना कामगार म्हणून नियुक्त करु नये.
- 9 तासांपेक्षा जास्त वेळ मुलांना काम देऊ नये.

### 2) 1892 चा फॅक्टरी अॅक्ट

मेजर लेथब्रीज कमिशनच्या अहवालावर आधारित.

1) 50 पेक्षा जास्त कामगार चार महिन्यांपेक्षा अधिक काळ काम करतात ती जागा म्हणजे फॅक्टरी.

2) स्त्रियांसाठी कामाचे तास 11. दुपारी 1 ते 1.30 सुटटी. सकाळी 6 पूर्वी व संध्याकाळी 6.30 नंतर कामावर नको.

3) आठवडयाची सुटी रविवारी.

### 3) 1911 चा फॅक्टरी अॅक्ट :

स्मिथ कमिशनच्या अहवालावर आधारित

1) मुलांच्या कामाचे तास 6

2) स्त्रियांच्या कामावर रात्रपाळीची बंदी

3) पुरुषांच्या कामाचे तास 12

### 4) 1938 चा बालमजुरी कायदा :

1) रेल्वे व गोदीमध्ये सामानाची ने आण करण्यासाठी 15 वर्षाखालील मुलांना नेता येणार नाही.

2) पुढे 1939 मध्ये आगपेटीच्या व्यवसायात 12 वर्षांखालील मुलांना कामावर घेण्यास बंदी घालण्यात आली.

**<u>5) 1948 चा फॅक्टरी ॲक्ट :</u>**

भारत सरकारने व्याप्ती वाढविली.

1) 10 किंवा त्यापेक्षा जास्त कामगार असणा-या कारखान्यांना लागू.

2) यांत्रिक शक्ती नसलेल्या कारखान्यांत कामगारांची मर्यादा 20

3) सर्व कारखान्यांत दररोज 8 तास काम. आठवडयात 48 तास

4) 14 वर्षांखालील मुलांना कामावर ठेऊ नये.

5) स्त्रियाना 8 तासांपेक्षा अधिक काम नको. संध्याकाळी 7 नंतर त्यांना काम नको.

6) 500 पेक्षा जास्त कामगार असलेल्या कारखान्यात एक कामगार कल्याण अधिकारी.

**<u>6) 1948 चा किमान वेतन कायदा :</u>**

- 13 असंघटित उदयोगांसाठी
- केंद्र व राज्य सरकारांना कामाचे वेतन ठरवण्याचा अधिकार प्राप्त.
- पाच वर्षानी या कायदयात दुरुस्तीची तरतूद

# ब) महाराष्ट्राती दलित चळवळ

तीन टप्पे : **आंबेडकर पूर्व दलित चळवळ**

**आंबेडकरांची दलित चळवळ**

**आंबेडकरोत्तर दलित चळवळ**

## आंबेडकरपूर्व दलित चळवळ :

### 1) महात्मा फुले :

- 1851 पुण्यात अस्पृश्यांसाठी पहिली शाळा
- 1868 मध्ये स्वत:च्या घरातील पिण्याच्या पाण्याचा हौद अस्पृश्यांसाठी खुला.
- 1877 मध्ये कृष्णराव भालेकर यांच्या मदतीने दीनबंधू हे वृत्तपत्र सुरु.
- महार मांग इ.लोकांस विदया शिकवणारी मंडळी नावाची संस्था स्थापन
- 1873 : सत्यशोधक समाजाची स्थापना करुन अस्पृश्यांनाही ईश्वरभक्ती करण्याचा अधिकार प्रतिपादित केला.

### 2) गोपाळ बाबा वलंगकर :

- म.फले यांच्या विचारांचा मोठा प्रभाव
- 1890 मध्ये दापोली येथे अनार्य दोष परिहार समाज स्थापन
- विटाळ विध्वंसन प्रसिध्द केले.
- दलितांमधील पहिले वृत्तपत्र वार्ताहर .

### 3) शिवराम जानबा कांबळे :

- वलंगकर, म.फुले, बाबा पदमनजी, आगरकर, लोकहितवादी यांच्या विचारांचा प्रभाव
- पुण्यातील रहिवासी. मराठा, दीनबंधू या वृत्तपत्रांमध्ये 1902 मध्ये पहिला लेख प्रसिध्द केला.
- अस्पृश्यांना पोलीस व लष्करामध्ये नोक-या मिळाव्यात व त्यांच्या मुलांचे शिक्षण सरकारने करावे या साठी शाळा व वाचनालय सुरु करण्याच्या उददेशाने पुण्यामध्ये 1904 साली श्री शंकर प्रासादिक सोमवंशीय हितचिंतक मित्र समाज या संस्थेची स्थापना.

### 4) राजर्षी शाहू महाराज :

- म.फुले यांच्या विचारांचा प्रभाव

- सर्वप्रथम अस्पृश्यता विरोधी कायदा अंमलात आणला.
- 1902 मध्ये कोल्हापूर संस्थानात सरकारी नोक-यांमध्ये मागासवर्गीयांसाठी 50 टक्के जागा राखीव
- महार वतने रदद करुन त्या जमीनी अस्पृश्यांच्या नावे करुन दिल्या.
- 1920 मध्ये माणगाव येथे पहिली अस्पृश्य परिषद डॉ.आंबेडकरांना अस्पृश्यांचे नेतृत्व करण्यास प्रोत्साहन दिले
- 1920 मध्ये मूकनायक या आंबेडकरांच्या पहिल्या साप्ताहिकासाठी आर्थिक मदत केली.
- अस्पृश्यांच्या मुलांसाठी शाळा व वसतीगृहांची सोय.

**5) महाराजा सयाजीराव गायकवाड :**

- परिवर्तनवादी विचारांचे कटटर पुरस्कर्ते
- डॉ.आंबेडकरांना शिष्यवृत्ती देऊन अमेरिकेला शिक्षणासाठी पाठवले.
- 23 मार्च 1918 रोजी मुंबई येथे अस्पृश्यता निवारक परिषद भरविली. या परिषदेचे अध्यक्ष सयाजीराव गायकवाड होते.

**6) महर्षी वि.रा.शिंदे :**

- प्रार्थना समाजाचे प्रचारक
- 12 ऑक्टो 1906 रोजी डिप्रेस्ड क्लासेस मिशन सोसायटी ऑफ इंडिया या संस्थेची मुंबई येथे स्थापना. याच दिवशी एल्फिन्स्टन रोड येथे पहिली शाळा सुरु.ठाणे, मालवण, अमरावती, अकोला इ.ठिकाणी शाळा व वसतीगृह सुरु केले.
- 1912 मध्ये पुण्यात फर्ग्युसन कॉलेज येथे अस्पृश्य व ब्राम्हण यांच्या एकत्र सहभोजनाचा कार्यक्रम घेतला.
- 1917 मध्ये मुंबई येथे नारायण चंदावरकर या।च्या अध्यक्षतेखाली जाहीर सभा घेऊन डॉ. आंबेडकरांना मानपत्र दयावे अशी मागणी केली.

**7) किसन फागूजी बनसोडे :**

- जन्म : नागपूर .
- अस्पृश्यांची शैक्षणिक, आर्थिक प्रगती व्हावी यासाठी सन्मानबोधक निराप्रितसमाज स्थापन.
- सहका-यांच्या मदतीने चोखामेळा सुधारणा मंडळ व वाचनालय स्थापन.

## डॉ. आंबेडकरांची दलित चळवळ :

### डॉ.आंबेडकर :

- जन्म : महू 14 एप्रिल 1891.
- 1907 मध्ये मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण
- प्राचीन भारतातील व्यापार या विषयात एम.ए.
- भारताच्या राष्ट्रीय नफ्याचा वाटा या प्रबंधाबददल कोलंबिया विदयापीठाकडून पीएच.डी.
- प्रॉब्लेम ऑफ रुपी या विषयावर लंडन विदयापीठाने डी.एस्सी ही पदवी दिली.
- 1923 मध्ये बॅरिस्टर ही परिक्षा उत्तीर्ण.

### दलितांसाठी कार्य :

- मार्च 1920 मध्ये माणगाव येथे अस्पृश्य परिषदेत शाहू महाराजांनी दलित चळवळीचे नेतृत्व त्यांच्याकडे दिले.
- 1920 मध्ये मूकनायक साप्ताहिक
- 20 जुलै 1924 रोजी बहिष्कृत हितकारिणी सभा स्थापन. अध्यक्ष आंबेडकर व सचिव सीताराम शिवतरकर . या सभेचे ब्रीदवाक्य होते : शिका, संघटित व्हा आणि संघर्ष करा.
- 19 व 20 मार्च 1927 रोजी महाड येथे ब.हि.सभेचे✕ाधिवेशन भरवून चवदार तळयावर जाउन पाणी पिण्याचे ठरले. त्यानुसार 25 मार्च रोजी चवदार तळयावर सत्याग्रह

- 25 व 26 डिसेंबर 1927 रोजी महाड येथे सत्याग्रह परिषद. यावेळी मनुस्मृती या ग्रंथाचे दहन.
- 3 मार्च 1930 रोजी बाबासाहेबांच्या नेतृत्वाखाली नाशिकच्या काळाराम मंदीरात प्रवेश सत्याग्रह. 1934 पर्यंत हा सत्याग्रह सुरु राहिला. स्त्रियांचाही सहभाग. 1934 मध्ये आंबेडकरांच्या आदेशानेच सत्याग्रह मागे घेण्यात आला

**शैक्षणिक कार्य**

- 1928 मध्ये दलितांच्या शिक्षणासाठी डिप्रेस्ड क्लासेस एज्युकेशन सोसायटी स्थापन.
- 1945 मध्ये मुंबई येथे पिपल्स एज्युकेशन सोसायटीची स्थापना. मुंबई येथे सिध्दार्थ कॉलेज.
- 1950 मध्ये औरंगाबाद येथे मिलिंद कॉलेज.
- 1945 साली 20 विदयार्थ्यांना उच्च शिक्षणासाठी अमेरिका व इंग्लडला पाठवले.

**राजकीय चळवळ**

- 1919 मध्ये दलितांना राजकीय हक्क देण्यासाठी नेमलेल्या साऊथबरो यांच्या अध्यक्षतेखालील मतदान कमिटी मध्ये सरकारने आंबेडकर व वि. रा. शिंदे यांची निवड केली. बाबासाहेबांनी मतदानाचा हक्क, उमेदवारीचा हक्क, अस्पृश्यांसाठी स्वतंत्र मतदारसंघ इ .मागण्या केल्या.
- 1927 च्या सायमन कमिशनकडे आंबेडकरांनी अस्पृश्यांच्या हक्कासंबंधी व मुंबई प्रांतातील राजकीय हक्काविषयी दोन खलिते कमिशनकडे पाठवले. सायमन कमिशनने अस्पृश्यांना राजकीय हक्क दयावेत अशी शिफारस केली, मात्र त्यातील काही तरतूदींना आंबेडकरांनी विरोध केला.
- 19मार्च 1928 रोजी मुंबई कायदेमंडळात महार वतन बिल मांडले. महार वतने खालसा करुन त्यांना त्यांच्या इच्छेप्रमाणे काम व वेतन ठरवण्याचा अधिकार दयावा अशी मागणी करण्यात आली.

- तीनही गोलमेज परिषदांना हजर राहून अस्पृश्यांसाठी स्वतंत्र मतदारसंघ देण्याचा आग्रह धरला.जातीय निवाडयात स्वतंत्र मतदारसंघ मिळाले, मात्र गांधीजींच्या उपोषणामुळे त्यांनी माघार घेत पुणे करार केला. स्वतंत्र मतदारसंघाऐवजी राखीव जागा 148 ( 18 टक्के).
- 15 ऑगस्ट 1936 रोजी स्वतंत्र मजूर पक्ष स्थापन करुन 1937 च्या निवडणूका लढवल्या. 13 जागा जिंकल्या
- 13 ऑक्टो 1935 रोजी येवला येथे जाहीर सभेत मी हिंदू म्हणून जन्माला आलो असलो तरी हिंदू म्हणून मरणार नाही. अशी घोषणा.
- 18 जुलै 1942 रोजी शेडयुल्ड कास्ट फडरेशन या नव्या पक्षाची स्थापना.
- त्यांना रिपब्लीकन पार्टी ची स्थापना करावयाची होती. मात्र त्यांचे त्यापूर्वीच निधन झाले. त्यांचे हे स्वप्न त्यांच्या एन.शिवराज, दादासाहेब गायकवाड, दादासाहेब रुपवते या सहका-यांनी 1957 मध्ये हा पक्ष स्थापन करुन पूर्ण केले.
- राज्यघटना निर्मिती : मसुदा समितीचे अध्यक्ष.त्यामुळेच भारतीय घटनेचे शिल्पकार .
- 14 ऑक्टोबर 1956 रोजी नागपूर येथे बौध्द धर्माची दीक्षा.
- 6 डिसेंबर 1956 रोजी आंबेडकरांचे महापरिनिर्वाण.

## आंबेडकरांनंतरची दलित चळवळ :

- दादासाहेब गायकवाड, जी. टी. मेश्राम, सी. एन. शिवराज, बी. सी. कांबळे, रा. सु. गवई, बलवंतराव वराळे, बी.जी. खोब्रागडे, हरिहर सोनुले इ.नी दलित चळवळ पुढे नेली.
- 3 ऑक्टोबर 1957 रोजी रिपब्लीकन पार्टी ऑफ इंडिया हा पक्ष स्थापन.

## दलित पॅंथर ची स्थापना :

- 9 जुलै 19772 रोजी दलित पॅंथरची स्थापना: नामदेव ढसाळ, ज. वि. पवार, राजा ढाले, रामदास सोरटे, रामदास आठवले, अरुण कांबळे इ.

## मराठवाडा विदयापीठ नामांतर चळवळ :

- औरंगाबाद येथील मराठवाडा विदयापीठाला डॉ. आंबेडकरांचे नाव दयावे म्हणून 1977 पासून नामांतर चळवळ सुरु झाली. सर्वप्रथम दलित पॅंथरचे सरचिटणीस गंगाधर गाडे यांनी 7 जुलै 1977 रोजी ही मागणी केली. पुढे ना. शरद पवार यांच्या मुख्यमंत्रीपदाच्या काळात महाराष्ट्र विधीमंडळाने मराठवाडा विदयापीठाला डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विदयापीठ असे नाव देण्याचा ठराव संमत केला.मात्र या ठरावाला शिवसेना व इतर हिंदुत्ववादी संघटनांचा विराध होता. त्यामुळे हिंसक आंदोलन सुरु झाले. 1978 ते 1994 पर्यंत हे आंदोलन चालले.
- शरद पवार यांनी 13 जाने 1994 रोजी दूरदर्शनवरुन मराठवाडा विदयापीठाला डॉ . बाबासाहेब आंबेडकर यांचे नाव दिले गेल्याचे जाहीर केले. 14 जाने पासून हे विदयापीठ डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विदयापीठ या नावाने ओळखले जाऊ लागले.
- याच दिवशी नांदेड येथे स्वामी रामानंदतीर्थ मराठवाडा विदयापीठ या नावाने नवीन विदयापीठ सुरु करण्याची घोषणा करण्यात आली.

## क) स्त्री मुक्ती चळवळ :

- 1813 च्या चार्टर ॲक्ट नुसार शिक्षणासाठी दरवर्षी 1 लाख रुपये कंपनीने खर्च करावेत, असे बंधन घालण्यात आले.
- स्त्री शिक्षणाचे कार्य सुरु करण्याचे श्रेय ख्रिस्ती मिशनरींकडे जाते.
- 1824 मध्ये अमेरिकन मराठी मिशन ने आणि 1828 मध्ये चर्च मिशन सोसायटी ने स्त्री शिक्षणाची चळवळ सुरु केली.
- जॉन विल्सन यांची पत्नी मार्गारेट हिने मुंबईत इ.स.1839 मध्ये मुलींसाठी तीन शाळा सुरु केल्या.
- मेरी कारपेंटर यांनी स्त्रिया व दुर्बल घटक यांच्यासाठी शिक्षणप्रसाराचे कार्य केले.
- जॉन इलियट ड्रिंकवॉटर बॅथ्यून यानेही स्वत:च्या खर्चाने मुलींसाठी शाळा सुरु केल्या.

**<u>सुधारकांचे प्रयत्न :</u>**

1) राजा राममोहन रॉय यांच्या प्रयत्नातून सर्वप्रथम सतीची चाल बंद व्हावी यासाठी चळवळ. 1828 मध्ये सतीबंदीचा कायदा संमत.

2) लोकहितवादी यांनी शतपत्रांच्या माध्यमातून स्त्री सुधारणाविषयक विचार मांडले.

3) म. फुले यांनी 1848 मध्ये पुण्यातील भिडे वाडयात कनिष्ठ वर्गातील स्त्रियांसाठी शाळा सुरु केली. पत्नी सावित्रीबाई यांनाही शिकवले. 17 सप्टेंबर 1851 रोजी रास्ता पेठेत मुलींची दुसरी आणि 15 मार्च 1852 रोजी वेताळ पेठेत तिसरी शाळा सुरु केली. 1864 मध्ये आपल्या घरातच बालहत्याप्रतिबंधकगृह स्थापन केले.

4) न्या.रानडे यांनी 1865 मध्ये विधवा विवाह उत्तेजक मंडळ स्थापन केले. आपली पत्नी रमाबाई ला शिकवले.

5) गो.ग.आगरकर यांनी स्त्रियांनी जाकीटे (शिक्षणाची) घातलीच पाहिजेत, असा मूलमंत्र दिला.

6) विष्णुशास्त्री पंडित यांनी स्वत: एका विधवेशी विवाह करुन आदर्श घालून दिला. त्यांनी इंदूप्रकाश या वर्तमानपत्रातून स्त्री सुधारणेसंबंधी लेखन केले. त्यांनी पुनर्विवाह उत्तेजक मंडळ स्थापन केले. त्यांच्या विरोधात सनातनी लोकांनी हिंदूधर्म व्यवस्थापक सभा ही संघटना स्थापन केली.

7) महर्षी धोंडो केशव कर्वे यांनी विधवा विवाह उत्तेजक मंडळी या नावाची संस्था स्थापन केली. स्वत: एका विधवेशी पुनर्विवाह केला.स्त्रियांसाठी पुण्यात अनाथ बालिकाश्रम संस्था स्थापन केली. 1916 मध्ये हिंगणे येथे महिला विदयापीठाची स्थापना केली. 1920 मध्ये त्याला श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी असे नाव.

## महिला समाजसुधारक :

### 1) सावित्रीबाई फुले

- या महाराष्ट्रातील पहिल्या स्त्री शिक्षिका, मुख्याध्यापिका. त्यांचा जन्म दिन 3 जाने स्त्री मुक्ती दिन साजरा केला जातो. पती निधनानंतर त्यांनी सत्यशोधक समाजाचे कार्य केले. विधवा पुनर्विवाह घडवून आणणारी सभा स्थापन केली.

2) डॉ. आत्माराम पांडूरंग तर्खडकर यांनी आपल्या तीन मुलींना **दुर्गा, अन्नपूर्णा व माणिक** यांना शिक्षण दिले. अन्नपूर्णा ही विलायतेत शिक्षणासाठी जाणारी पहिली महाराष्ट्रीयन महिला होती. तिचा विवाह आयरिश पुरुषाबरोबर झाला.

### 3) पंडिता रमाबाई

- यांनी 1882 मध्ये पुण्यात न्या.रानडे व रमाबाई रानडे यांच्या मदतीने आर्य महिला समाज ची स्थापना केली.
- भारतातील शिक्षण पध्दतीत पुनर्रचना करण्यासाठी 1883 मध्ये नेमण्यात आलेल्या हंटर कमिशनसमोर रमाबाईनी साक्ष नोंदविली.मुलींच्या शाळेत स्त्री शिक्षिकांप्रमाणेच इन्स्पेक्टर सुध्दा स्त्री असावी, असे त्यांचे मत होते.
- व्हॉइसरॉय डफरीन ची पत्नी लेडी डफरीन च्या नावाने फंड स्थापन करुन त्यांनी स्त्रियांसाठी वैदयकीय सेवा उपलब्ध करुन दिली.
- 1889 मध्ये दोन विदयार्थीनी घेऊन मुंबई येथे शारदा सदन शाळा सुरु केली. 1891 मध्ये विधवांसाठी शारदा सदनची शाखा सुरु केली.
- 1896 मध्ये केडगाव येथे मुक्ती सदन या ख्रिस्ती संस्थेची स्थापना केली.
- अंधांसाठी पहिली शाळा बातमी सदन व अनाथ मुलांसाठी सदानंद सदन सुरु केले.

- 1919 मध्ये सरकारने त्यांचा कैसर इ हिंद हे सुवर्णपदक देऊन गौरव केला.
- स्त्रियांच्या मुक्तीची आदय प्रवर्तक महणून रमाबाईचा महाराष्ट्रात गौरव केला जातो.
- 5 एप्रिल 1922 रोजी मृत्यू.

**4) रमाबाई रानडे**

1882 मध्ये पं.रमाबाई, काशिताई कानिटकर आणि रमाबाई रानडे यांनी आर्य महिला समाज ची स्थापना केली.

1894 साली पुण्यात हिंदू लेडिज सोशल क्लब स्थापन करुन स्त्री शिक्षणाचे कार्य केले.

1904 मध्ये येरवडा तुरुंगाच्या मानद अधीक्षिका म्हणून निवड .

1908 मध्ये मुंबई येथे सेवासदन ची स्थापना.

1909 मध्ये पुण्यात सेवासदन ची शाखा.

1918 मध्ये मुलींना प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत दयावे यासाठी प्रयत्न केले.

**5) आनंदीबाई जोशी :**

अमेरिकेत जाऊन वैदयकीय शास्त्रातील पदवी मिळवणारी देशातील पहिली भारतीय महिला होय. मिसेस टी. कारपेंटर यांच्या मदतीने फिलाडेल्फिया येथील वूमन्स मेडिकल कॉलेजमध्ये त्यांनी प्रवेश घेतला.तेथून 1896 साली त्या एम.डी.झाल्या.

1897 साली भारतात आल्यानंतर त्यांचा मृत्यू झाला.

- ताराबाई शिंदे यांनी 1882 मध्ये स्त्री पुरुष तुलना या विषयावर ग्रंथ लिहिला.
- डॉ.रखमाबाई यांनी कृतीशील आणि स्त्री प्रश्नांच्या दृष्टीने आपले विचार हिंदू लेडी या नावाने टाईम्स पत्रातून मांडले.
- वि. रा.शिंदे यांची बहीण जनाक्का शिंदे यांनी स्पृश्य आणि अस्पृश्य स्त्रियांना एकत्रित आणण्याचा प्रयत्न केला. 1907 मध्ये निराश्रित सेवासदन ची स्थापना केली.

## स्त्रियांसंबंधी कायदे

- 1856 : विधवा पुनर्विवाह कायदा
- 1872 : स्पेशल मॅरेज ॲक्ट : सर्वप्रथम सिव्हिल मॅरेज उपलब्ध करुन दिले.
- 1938 : हिंदू स्त्रियांचे प्रॉपर्टी हक्क या कायदयाने स्त्रियांचे मालमत्तेतील हक्क वाढविले.
- 1946 : हिंदू विवाहित स्त्रियांचा विभक्त राहून पोटगी मागण्याचा हक्क कायदा.
- 1929 : फॅक्टरी ॲक्ट अन्वये स्त्रियांना प्रसूती रजा.
- 1939 व 1948 : घातक व ताण पडणा-या कामावर स्त्रियांना नियुक्त करु नये, अशी तरतूद.

## हिंदू कोड बिल :

- 1930 पासून हिंदू कायदयाची पुनर्रचना करण्याची गरज होती.
- त्यासाठी 1941 मध्ये राव समिती ने हिंदु कायदयांचे सुसूत्रीकरण करुन हिंदू कोड बिल तयार केले.
- भारतीय राज्यघटनेचे कार्य पूर्ण झाल्यानंतर डॉ.आंबेडकर यांनी हिंदू कोड बिल याकडे लक्ष दिले.
- परंतु या बिलाला मोठा विरोध.हिंदू समाज उध्वस्त होईल, अशी भिती.
- हिंदू स्त्रियांच्या हक्कासाठी डॉ.आंबेडकरांनी आग्रह धरला.
- शेवटी या बिलाचे चार निरनिराळे भाग करुन चार कायदे केले :
  1) हिंदू विवाह कायदा
  2) हिंदू वारसा हक्क कायदा
  3) हिंदू अज्ञान व पालकत्व कायदा
  4) हिंदू दत्तक व पोटगी कायदा

असे चार कायदे 1955-58 मध्ये संमत झाले.याला हिंदू कोड बिल असे म्हणतात.

1961 मध्ये हुंडा विरोधी कायदा मंजूर .1884 साली त्यात सुधारणा.

## ड) आदिवासी सुधारणा चळवळ :

- सह्याद्री विभागात ठाणे , रायगड, पुणे, नाशिक, नगर या जिल्हयांत ठाकर, कातकरी, वारली, महादेव कोळी, काथोडी, मल्हार कोळी, ढोरकोळी इ.जमाती.
- सातपुडा विभागामध्ये औरंगाबाद, जळगाव, धुळे, अमरावती या जिल्हयांत घातका, पावरा, हुबळा, भिड, गावीत, कोरकू, मावची, कोलम, तोडवी या जमाती.
- गोंडवना विभागामध्ये नांदेड, यवतमाळ, भंडारा, चंद्रपूर, गडचिरोली या जिल्हयांत हलबा, कोला, कोया, माडिया, गोंड, आंध, कवर, परधान, भिल्ल इ. जमातीचे लोक आढळतात.

**आदिवासींच्या चळवळीचे स्वरुप :**

- ख्रिस्ती मिशनरींनी आदिवासींच्या विकासाचे कार्य प्रथम हाती घेतले
- म. गांधींच्या सूचनेवरुन ठक्कर बाप्पांनी भिल्ल जमातीच्या शैक्षणिक व सामाजिक उन्नतीसाठी कार्य केले. म. गांधीजींनी ठक्कर बाप्पांना भिल्लांचे धर्मगुरु म्हणून संबोधले होते. बाप्पानी देशात 21 संस्था निर्माण करुन आदिवासींच्या कल्याणासाठी विशेष प्रयत्न केले.

**बाळासाहेब खेर यांचे कार्य :**

- ठाणे जिल्हयातील वारली जमातीबाबत बाळासाहेब खेर यांनी सहानूभूतीपूर्ण दृष्टीकोन स्वीकारला होता. जिल्हाधिकारी डी. सिमिंग्टन यांच्या नेतृत्वाखाली आदिवासींच्या स्थितीची पाहणी करुन अहवाल सादर केला.

**शामराव व गोदावरी परूळेकर :**



- यांनी किसान सभेच्या माध्यमातून वारली समाजामध्ये जागृती, संघटन आणि हक्कांसाठी संघर्ष या पध्दतीने कार्य सुरु केले.उंबरगाव तालुक्यातील झरी येथील आदिवासी परिषदेत वेठबिगारी नष्ट करण्याचे आवाहन केले.गोदावरी परुळेकरांची सभा तळवडीत असताना त्यांच्या जिवाला धोका असल्याची खोटी प्रसिध्दी जमीन मालकांनी दिली. त्यामुळे 10 हजार आदिवासी संघर्षाच्या तयारीने आलेले होते. यावेळी जमीन मालकांनी पोलीसांना बोलावून त्यांच्यावर गोळीबार केला. ही घटना तळवडी गोळीबार म्हणून प्रसिध्द आहे.
- गोदावरी परुळेकरांचे जेव्हा माणूस जागा होतो हे पुस्तक प्रसिध्द आहे.

**ताराबाई मोडक :**

- ताराबाईंनी बोर्डी व नंतर ठाणे जिल्हयातील कोसबाड येथे शैक्षणिक कार्यास सुरुवात केली.
- आदिवासींच्या मुलांसाठी अंगणवाडया सुरु केल्या.
- कुरणशाळा, तांत्रिक, व्यावसायिक शिक्षण यासाठी त्यांनी परिश्रम घेतले.

**अनुताई वाघ :**



- अनुताईंनी ताराबाई मोडकांकडून प्रेरणा घेतली.
- कोसबाडच्या टेकडीवर आदिवासींच्या उन्नतीसाठी एक संस्था स्थापन केली. यालाच कोसबाड प्रकल्प म्हणून ओळखले जाते.
- आदिवासींच्या शिक्षणासाठी अनुताईनी पाळणाघरे, बालवाडया, प्राथमिक शाळा, प्रौढ शिक्षण वर्ग, बालसेविका ट्रेनिंग कॉलेज इ.शैक्षणिक संस्था सुरु कैल्या.
- अनुताईंना भारत सरकारने पदमश्री पुरस्कार दिलेला आहे.
- कोसबाड च्या टेकडीवरुन हा त्यांचा ग्रंथ प्रसिध्द आहे.

**<u>दामूअण्णा टोकेकर :</u>**

- यांनी हिंदू सेवा संघ स्थापन करुन शैक्षणिक कार्य सुरु केले.
- बीड जिल्हयातील डोमरी येथे सोनदरा गुरुकुल योजना, देवबांध येथे आदिवासी बहुविध सेवा संघाच्या माध्यमातून आदिवासींची सर्वांगीण प्रगती करण्याचा प्रयत्न केला.

**<u>कॉ.रेवजी पांडूरंग चौधरी :</u>**

- रेवजी चौधरी ऊर्फ देवजीभाई यांनी आदिवासींसाठी सामाजिक, शैक्षणिक व आर्थिक विकासाचे कार्य केले.
- त्यांनी सर्वप्रथम जव्हार संस्थानामधील वेठबिगारी पध्दत बंद करुन शैक्षणिक कार्याला सुरुवात केली. आश्रमशाळा सुरु करुन कोकणी, वारली, ठाकूर , कातकरी या समाजातील मुला-मुलींना शिक्षण दिले.
- जव्हारमध्ये खरेदी विक्री संघ स्थापन करुन आदिवासींची परिस्थिती सुधारण्याचा प्रयत्न केला.
- तलासरीच्या वनवासी विदयार्थी प्रकल्पाद्वारे आदिवासींचा विकास करण्याचा प्रयत्न केला.

**<u>पांडुरंग ढवळा साबळे :</u>**

- यांनी 1951 मध्ये ओम आदिशक्ती आदिवासी सेवा संघ ची स्थापना करुन मुंबई येथील सिमेंट कंपनीतील कामगार व मुलूंड येथील आदिवासी यांना एकत्र केले.

- आदिवासी लोकांना नोक-यांत सामावून घ्यावे आणि त्यांच्यासाठी स्वतंत्र राज्य निर्माण करावे अशी मागणी त्यांनी मुख्यमंत्री बाळासाहेब खेर यांच्याकडे केली.
- आदिवासी सेवा मंडळ स्थापन करुन आदिवासींच्या मुलासाठी रात्रीच्या शाळा सुरु केल्या.
- आदिवासी कल्याण केंद्र महाराष्ट्र ही संघटना स्थापन केली.

**<u>बापूराव कृष्णाजी देशमुख :</u>**

- यांनी आदिवासी समाजातील भगत आणि भोंदूगिरीवर सर्वप्रथम आवाज उठवण्याचे काम केले.
- व्यसनाधीनता आणि सामाजिक प्रथांच्या विरोधात चळवळ उभारली.
- त्यांच्याच प्रेरणेतून अखिल भारतीय आदिवासी परिषद स्थापन करण्यात यश आले.

**<u>मारुती शिवराम बोंडे :</u>**

- आदिवासी समाजातील लोकांना आश्रय देणे, आर्थिक मदत करणे, त्यांचे मनोबल वाढवणे इ.कार्य यांनी केले.

**<u>डॉ.रामराव वाडिवे :</u>**

- यांनी आदिवासी सुधार सेवा समितीची स्थापना केली.
- बालमंदिर, प्रौढ शिक्षण वाचनालये सुरु करुन आदिवासी तरुणांमध्ये शिक्षणाची व वाचनाची आवड निर्माण केली.
- आदिवासी सेवा मंडळ सुरु केले.
- गोंडवाना या नियतकालिकाच्या संपादकपदाची धुरा त्यांनी सांभाळली.

**<u>बाबूराव नारायण मडावी :</u>**

- यांनी आदिवासी विकासासाठी महत्वपूर्ण कार्य केले. आदिवासी समाजाला संघटित व जागृत करण्याचे काम करुन संपूर्ण महाराष्ट्रातील हक्कासाठी लढा सुरु केला.

- मेळावे आयोजित करुन विविध संस्था स्थापन केल्या.
- आदिवासी विकास महामंडळाची स्थापना करण्यात मडावी आघाडीवर होते.
- आदिवासींना रास्त सवलती मिळाव्यात म्हणून आरक्षणाची व्यवस्था केली.
- विधानसभेत आदिवासीना प्रतिनिधित्व मिळावे म्हणून त्यांनी शासनाकडे पाठपुरावा केला.

**<u>महादेव गोपाळ कडू :</u>**

- यांनी ठाणे जिल्हा प्रशिक्षण प्रसारक मंडळा ची स्थापना केली.
- आदिवासी समाजोन्नती संघाची स्थापना केली.

**<u>इतर :</u>**

**सुखदेव बाबुराव उईके :** जंगल बचाव मानव बचाव , आम्ही आमच्या आरोग्यासाठी ही संस्था.

**काळूराम काकडया दोधडे :** आदिवासींच्या जमिनी पुन्हा मिळवण्यासाठी प्रयत्न

**कॉ.नजूबाई आटया गावित :** श्रमिक महिला संघ स्थापन.

**रामचंद्र चिमाजी जंगले :** आदिवासी युवक क्रांती दल.

**देवाजी तोफा :** मेंढा-लेखा गावाच्या माध्यमातून आमच्या गावात आम्हीच सरकार अशी घोषणा देऊन जंगलावरील आदिवासींचा पारंपारिक हक्क सिध्द करण्याचा प्रयत्न केला.

## <u>आदिवासी विकास योजना :</u>

- 1972 : आदिवासी विकास संचलनालय स्थापन. सहयाद्री विभागाचे कार्य नाशिक आणि गोंडवाना विभागाचे कार्य नागपूर येथे सरु करण्यात आले. त्यांची 21 विकास कार्यालये सुरु करण्यात आली.
- 1983 : आदिवासी विकास विभाग स्थापन.
- 1992 : आदिवासी विकास संचलनालयाची पुनर्रचना. 23 प्रकल्प कार्यालये.

# स्वातंत्र्योत्तर महाराष्ट्र

**संयुक्त महाराष्ट्र आंदोलन :**



- **1947** मध्ये भारत स्वतंत्र झाला तरी, त्यानंतर भाषावर प्रांतरचनेची मागणी जोर धरु लागली.
- महाराष्ट्रातही मराठी भाषिक राज्याची मागणी करणारी संयुक्त महाराष्ट्र चळवळ 1946 पासून सुरु झाली.
- अनेक स्थित्यंतरातून या चळवळीची वाटचाल होऊन शेवटी 1 मे 1960 रोजी महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली.

## संयुक्त महाराष्ट्र : ऐतिहासिक पार्श्वभूमी

- 1908 : साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणातून चिंतामणराव वैदय यांनी मराठी भाषकांच्या एकीकरणाची  गरज प्रतिपादन केली.
- 1911 :  न.चिं केळकर केसरी मध्ये लिहितात :  मराठी भाषा बोलणा-यांची सर्व लोकसंख्या एका अंमलाखाली असावी.
- 1915 : लो. टिळकांनी केसरीतून  भाषावार प्रांतरचनेची मागणी केली.
- 1938 :  रामराव देशमुखांनी ठराव मांडला की, व-हाड चा  वेगळा प्रांत करावा.

- 1939 : अहमदनगर येथील साहित्य संमेलनात मराठी भाषकांचा एक प्रांत बनवावा आणि त्याला संयुक्त महाराष्ट्र असे नाव दयावे असा ठराव संमत.
- 1941 : रामराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली संयुक्त महाराष्ट्र सभा स्थापन.
- 1942 : डॉ.टी.जे.केदार यांच्या नेतृत्वाखाली महाराष्ट्र एकीकरण परिषद भरवण्यात आली.

- महाविदर्भ व्हावा असे लोकनायक बापूजी अणे यांना वाटत होते.
- ग.त्रि.माडखोलकर यांनी दै.तरुण भारत मधून आंध्रप्रदेशसाठी जसे पटटाभि सीतारामय्या लढले तसे महाराष्ट्रासाठी आपले पुढारी का लढत नाहीत, असा सवाल केला.त्यांनी म. गांधीजींशी 12 जुलै 1942 रोजी पत्रव्यवहार केला. गांधींनी संयुक्त महाराष्ट्र कल्पनेला पाठिंबा दिला मात्र मुंबई महाराष्ट्रात सामील करण्यास विरोध केला.
- 1946 साली बेळगावच्या मराठी साहित्य संमेलनात ग.त्रि.माडखोलकर यांनी आपल्या भाषणात संयुक्त महाराष्ट्रावरच भर दिला.

## <u>1946 चे बेळगाव साहित्य संमेलन :</u>

**12 मे 1946 रोजी बेळगाव येथील साहित्य संमेलनात झालेले ठराव :**

1) संयुक्त महाराष्ट्र निर्माण होईपर्यंतच्या काळात भाषिक, शैक्षणिक व सांस्कृतिक उन्नती होण्यासाठी हैद्राबाद संस्थानातील मराठवाडा व गोमंतक या प्रदेशांना संपूर्ण प्रादेशिक स्वायत्तता असावी.

2) संयुक्त महाराष्ट्राचे संयोजन व प्रांतरचना करताना त्याच्या चतु:सीमेवरील बेळगाव, कारवार, गुलबर्गा, आदिलाबाद, बिदर, बालाघाट, छिंदवाडा, बैतुल, निमाड इ.जिल्हयात मिश्रवस्ती आहे. त्यातील कायम रहिवासी असणा-या जनतेचा कौल प्रौढ व गुप्त मतदान पध्दतीने घेऊन ते भाग कोणत्या प्रांतात घालावयाचे ते ठरवावे.

- याशिवाय संमेलनात संयुक्त महाराष्ट्र समिती स्थापन करण्यात आली. येथून ख-या अर्थाने संयुक्त महाराष्ट्रसंघर्षाला सुरुवात झाली.

**<u>संयुक्त महाराष्ट्र समिती :</u>**

बेळगाव साहित्य संमेलनात संयुक्त महाराष्ट्र समिती ची स्थापना 12 मे1946 रोजी झाली. तिचे सदस्य पुढीलप्रमाणे :

**केशवराव जेधे**

**ग. त्रि.माडखोलकर**

**द.वा. पोतदार**

**शंकरराव देव**

**श्री.शं. नवरे.**

**<u>उददेश :</u>**

1) भाषावार प्रांतरचनेच्या तत्वानुसार महाराष्ट्र राज्यात अजून समाविष्ट न झालेले मराठी भाषकांचे सलग प्रदेश या राज्यास जोडणे.

2) लोकसत्ताक व समाजवादी महाराष्ट्र स्थापन करणे.

3) सामाजिक, आर्थिक व राजकीय समता स्थापन करुन महाराष्ट्राच्या जीवनाची सहकारी तत्त्वावर उभारणी करणे.

4) समितीने पुरस्कृत केलेला कार्यक्रम राबवणे.

**<u>संयुक्त महाराष्ट्र परिषद :</u>**

- पुण्याच्या बैठकीत ठरल्याप्रमाणे 28 जुलै 1946 रोजी मुंबई येथे शंकरराव देव यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र एकीकरण परिषद भरली.
- या एकीकरण परिषदेत मराठी भाषिक प्रांताच्या निर्मितीसाठी कार्य करणा-या संयुक्त महाराष्ट्र परिषदेची स्थापना करण्यात आली.

- 14 एप्रिल 1947 रोजी जळगाव येथे परिषदेचे अधिवेशन झाले. या अधिवेशनात परिषदेची कार्यकारिणी निश्चित झाली.
- शंकरराव देव यांच्या अध्यक्षतेखाली संयुक्त महाराष्ट्र परिषदेचे कार्य जोमाने सुरु झाले.
- ग.त्रं.माडखोलकर, केशवराव जेधे, द.वा.पोतदार, श्री.शं.नवरे, दा.वि.गोखले, वसंतराव नाईक, सौ.प्रमिला ओक, पूनमचंद राका इ.नी संयुक्त महाराष्ट्र आंदोलनाचे नेतृत्व केले.

**<u>दार कमिशन : 1947 :</u>**

- घटनासमितीकडे डॉ.आंबेडकरांसह महाराष्ट्रातील नेत्यांनी भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न घटना समितीकडे नेल्यानंतर अध्यक्ष डॉ.राजेंद्रप्रसाद यांना भाषावार प्रांतरचनेचे महत्त्व वाटून त्यांनी 17 जून 1947 मध्ये न्यायाधीश एस.के.दार यांच्या अध्यक्षतेखाली भाषावार प्रांतरचना करावी की नाही, याचा विचार करण्यासाठी आयोग नेमला.
    - दार कमिशनने 20 प्रश्नांची प्रश्नावली महाराष्ट्रातील नेत्यांना दिली. 10 डिसेंबर 1948 रोजी दार कमिशन ने आपला अहवाल जाहीर केला. या अहवालात म्हटले होते की,
- भाषिक राज्ये निर्माण करण्याची योग्य वेळ अदयाप आलेली नाही.भाषावार प्रांतरचना ही भारताच्या ऐक्यास व एकात्मतेस मारक ठरेल.
    - या अहवालाविरोधात महाराष्ट्रात प्रक्षोभ.

**<u>अकोला करार 8 ऑगस्ट 1947 :</u>**

- दार कमिशनपुढे मराठी भाषिक प्रांतरचनेची मागणी एकमुखाने स्पष्ट व नेमकेपणाने मांडण्यासाठी निवडक कार्यकर्त्यांची अकोला येथे बैठक झाली.
- यामध्ये शंकरराव देव, मारोतराव कन्नमवार, रामराव देशमुख, धनंजयराव गाडगीळ, पूनमचंद रांका, महामहोपाध्याय द.वा.पोतदार, माडखोलकर, प्रमिला ओक, इ.नेत्यांनी महत्वपूर्ण भूमिका बजावली.
- विदर्भातील नेत्यांच्या मनात महाराष्ट्र एकीकरणाबाबत विश्वास निर्माण व्हावा, यची काळजी घेण्यात आली.

- 8 ऑगस्ट 1947 रोजी अकोला करार करण्यात आला.

1) संयुक्त महाराष्ट्र असा एक प्रांत असावा त्यामध्ये मध्य प्रांत व-हाड मधील मराठी भाषिकांचा व महाराष्ट्राचा असे उपप्रांत ठेवावेत.

2) प्रत्येक उपप्रांताला अलग कायदेमंडळ व मंत्रिमंडळ असावे.

3) सर्व प्रांतासाठी एक गव्हर्नर व एक डेप्युटी गव्हर्नर असावा. त्यांची निवडणूक प्रांतातून घ्यावी.

4) कायदेमंडळात लोकसंख्येच्या प्रमाणात प्रतिनिधी असावेत.

5) उपप्रांताच्या निवडणूका स्वतंत्रपणे घ्याव्यात.

6) उपप्रांताची उच्च न्यायालये स्वतंत्र असतील.

7) विशिष्ट बाबीसाठी संपूर्ण प्रांताचे खास न्यायालय असावे.

8) प्रांतासाठी एक पब्लिक सर्व्हिस कमिशन असावे.

- अकोला बैठकीत असेही ठरले की, संयुक्त महाराष्ट्राची निर्मिती करणे अशक्य असल्यास महाविदर्भ हा स्वतंत्र प्रांत निर्माण करण्याचे प्रयत्न करावेत.

**<u>जे.व्ही.पी.समिती :</u>**

- 29 डिसेंबर 1948 रोजी कॉंग्रेसच्या जयपूर अधिवेशनात दार कमिशनचा अहवाल नाकारला.
- पुन्हा नवीन समिती नेमली. यामध्ये जवाहरलाल नेहरु, वल्लभभाई पटेल आणि पटटाभी सीतारामय्या यांचा समावेश होता.
- हे तिघेही संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीला अनूकूल नव्हते.
- समितीने 5 एप्रिल 1949 रोजी आपला अहवाल प्रसिध्द केला.

**<u>समितीच्या शिफारशी :</u>**

1) भाषावार प्रांतरचना कॉंग्रेसला मान्य. पण ही योग्य वेळ नाही.

2) योग्य वेळ येताच आंध्र प्रांत बनविला जाईल.

3) मराठी भाषिकांचा महाराष्ट्र यथावकाश बनेल, पण त्यात मुंबई नसेल.

4) केवळ व-हाड प्रांत वेगळा होणार नाही.

5) कर्नाटकमधील अडचणी संपताच त्या प्रांताची निर्मिती केली जाईल.

6) त्रावणकोर व कोचीन एकत्र येण्यास तयार असतील तर, केरळ प्रांताची निर्मिती होईल.

- शिफारशींमध्ये मुंबई महाराष्ट्रात नसेल हे स्पष्टपणे नमूद असल्याने या अहवालाविरोधात महाराटष्ट्रभर तीव्र प्रतिक्रिया उमटल्या. जनजागृतीसाठी सेनापती बापट यांनी प्रभातफे-या सुरु केल्या.
- आचार्य अत्रे यांनी मुंबई महापालिकेत मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचा ठराव मांडला.तो 50 विरुध्द 35 मतांनी मंजूर झाला. म्हणजे जनतेचा कौल स्पष्ट झाला.
- 1952 मध्ये आंध्र राज्याची स्थापना झाल्यानंतर मराठी भाषिकांनाही आशा वाटू लागली.
- 1953 मध्ये यशवंतराव मोहिते यांनी विधानसभेत संयुक्त महाराष्ट्राच्या एकीकरणाचा ठराव मांडला.पण मोरारजी देसाई यांनी या ठरावाला ठाम विरोध केला.

## <u>नागपूर करार 28 सप्टे 1953 :</u>

संयुक्त महाराष्ट्र, विदर्भ आणि मराठवाडा या तिन्ही विभागांतील प्रमुख नेते नागपूरला एकत्र आले आणि त्यातून नागपूर करार झाला.

1) मराठी भाषिक मुलुखाच्या निरनिराळया विभागांत राहणा-या लोकांचे एक राज्य व्हावे.

2) मुंबई, मध्यप्रदेश, हैद्राबाद राज्यातील सर्व सलग मराठी भाषिक प्रदेशाचे हे राज्य बनावे. मुंबई त्याची राजधानी असेल.

3) प्रत्येक घटकावरील खर्च लोकसंख्येच्या प्रमाणात होईल.अविकसित मराठवाडयाकडे विशेष लक्ष दिले जाईल.

4) लोकसंख्येनुसार प्रत्येक विभागाला शासनात स्थान असेल.

5) उच्च न्यायालय मुंबई व नागपूर येथे असावे.

6) सरकारी नोकरभरतीत विदर्भ व मराठवाडयाला योग्य प्रतिनिधित्व.

7) नागपूर ही महाराष्ट्राची उपराजधानी. दरवर्षी किमान एक अधिवेशन येथे घेण्यात यावे.

नागपूर करारात भाऊसाहेब हिरे यांनी महत्वाची भूमिका बजावली.

करारावर विभागनिहाय सह्या करणारे प्रतिनिधी :

अ) महाविदर्भ : रामराव देशमुख, गोपाळराव खेडकर, रा.कृ.पाटील, पंजाबराव देशमुख व शेषराव वानखेडे
ब) पश्चिम महाराष्ट्र : भाऊसाहेब हिरे, यशवंतराव चव्हाण, देवकीनंदन नारायण व नाना कुंटे.
क) मराठवाडा : देवीसिंह चौहान, लक्ष्मणराव भाटकर, प्रभावतीदेवी जकातदार .

## राज्य पुनर्रचना आयोग ( एस.फाजलअली कमिशन)

- 29 डिसेंबर 1953 रोजी राज्य पुनर्रचना आयोग स्थापन केला.
- अध्यक्ष : एस.फाजलअली.
- सदस्य : ह्रदयनाथ कुंझरु, सरदार पण्णीकर .
- सर्व मराठी भाषिक विभागांनी आयोगाकडे आपापले म्हणणे सादर केले.
- गोमंतक मराठी साहित्य संमेलन कारवार येथे ना.ग.गोरे.यांच्या अध्यक्षतेखाली झाले. त्यामध्ये ठराव संमत झाला की, कारवार, हल्याळ, सुपे, बेळगाव, खानापूर, चंदगड यांचा एक जिल्हा बनवून तो महाराष्ट्रात सामील करावा.

**अहवाल :**

10 ऑक्टो 1955.

- विदर्भाचे स्वतंत्र राज्य असावे.
- गुजरात, मराठवाडयासह मुंबईचे द्विभाषिक राज्य व्हावे.

- हा अहवाल म्हणजे मराठी भाषिकांवरील वज्राघात ठरला.संपूर्ण महाराष्ट्रभर संतापाची लाट. तीव्र आंदोलने. मुंबईत निदर्शने.

**त्रिराज्याचा प्रस्ताव**

- मराठी लाकांचा तीव्र विरोध पाहून कॉंग्रेस वर्किंग कमिटीने दि.8 नोव्हेंबर 1955 रोजी नवीन त्रिराज्याचा ठराव पास केला.

अ) संपूर्ण गुजराती भाषिकांचे एकजिनसी राज्य असावे

ब) मुंबई शहर व उपनगरे यांचे 160 चौकिमी विस्ताराचे स्वतंत्र राज्य असावे.
क) मराठवाडयासह महाराष्ट्र राज्य असावे.

- महाराष्ट्रातील जनतेने हा प्रस्ताव साफ नाकारला.
- या प्रस्तावाने मोरारजी देसाई आणि त्यांचे समर्थक आनंदित झाले.
- मुख्यमंत्री या नात्याने त्यांनी या ठरावाला मुंबई शासनाची संमती घेण्याची घाई त्यांनी चालविली.
- 18 नोव्हे 1955 रोजी  त्रिराज्य योजना मंजूरीसाठी विधानसभेत ठराव मांडणार होते.मात्र त्यांच्या विरोधात सेनापती बापट यांच्या नेतृत्वाखाली मुंबईत मोर्चा निघाला. त्याची सुरुवात ओव्हल मैदानावरुन झाली. 500 निदर्शकांना कैद.
- त्याच दिवशी कामगार मैदानावर सुमारे 50 हजार लोकांच्या उपस्थितीत जाहीर सभा झाली. कॉम्रेट श्रीपाद अमृत डांगे यांनी मार्गदर्शन केले. या सभेत त्रिराज्य योजना फेटाळण्यात आली.
- संयुक्त महाराष्ट्राचा लढा अधिक गतिमान करण्यासाठी दि.21 नोव्हेंबर 1955 रोजी एक दिवसाचा लाक्षणिक संप करण्याचा निर्णय घेतला गेला.

**<u>मोरारजी देसाई व स.का.पाटील यांच्या सभा (20 नोव्हेंबर 1955 ) :</u>**

- नियोजित संपाच्या एक दिवस अगोदरच मोरारजी व स.का.पाटील यांनी चौपाटीवर सभा घेतली.
- स.का.पाटील म्हणाले :  महाराष्ट्राला  5000 वर्षांतही मुंबई मिळणार नाही.
- मोरारजी म्हणाले : कॉंग्रेस जिवंत असेपर्यत मुंबईची जनता महाराष्ट्रात समील होणार नाही. आकाशात चंद्र, सूर्य असेपर्यंत मुंबई महाराष्ट्राला मिळणार नाही.
- या दोघांच्या मुक्ताफळानंतर जनता संतापली. सभेतून स्टेजवर दगडफेक सुरु झाली.सभा उधळली गेली.

- पूर्वी ठरल्याप्रमाणे 21 नोव्हेंबर 1955 रोजी सर्व बाजूंनी लोक ओव्हल मैदानाकडे जाऊ लागले.
- मोरारजी सरकारने जमावबंदी आदेश जारी केला.
- चार ते पाच लाख लोकांनी सेनापती बापट यांच्या नेतृत्वाखाली बंदी आदेश मोडला.
- पोलीसांचा गोळीबार . 15 आंदोलक हुतात्मा व 300 लोक जखमी. 400 पेक्षा जास्त अटक.
- यानंतर सर्व राज्यभर आदोलने सुरु.

**<u>पं.नेहरुंचा निर्णय : 16 जाने 1956</u>**

उग्र आंदोलन पाहून पं.नेहरुंनी पुढीलप्रमाणे निर्णय घोषित केले.

1) मुंबई शहर केंद्रशासित राहील.

2) विदर्भासह संपूर्ण मराठी भाषिक महाराष्ट्र आणि सौराष्ट्र कच्छ सह गुजरात अशी दोन वेगळी राज्ये असतील.

3) संबंधित पक्षांच्या मतैक्याने सीमावाद सोडवला जाईल.

4) कानडी भाषिकांचे म्हैसूर राज्य होईल.

5) भाषिक अल्पसंख्यांकाच्या संरक्षणाबाबतच्या शिफारशी सरकारने मान्य केल्या.

- परंतु या निर्णयामुळे मराठी भाषिकांचे समाधान होणे शक्य नव्हते. मुंबई वेगळी होणार असे संकेत दिल्यामुळे मुंबई पेटून उठली. दोन-तीन दिवस आंदोलकांवर गोळीबार 90 लोक मृत्यूमुखी पडले. या कृतीचे वर्णन लालजी पेंडसे यांनी नरमेधयज्ञ असे केले.
- आंदोलन आता संपूर्ण राज्यभर पोहोचले.
- भारतीय अर्थमंत्री चिंतामणराव देशमुख यांनी अर्थमंत्रीपदाचा राजीनामा दिला. पं.नेहरुंवर टीका केली.
- मोरारजी सरकारच्या गोळीबारात एकूण 106 जण हुतात्मे झाले.
- 6 फेब्रुवारी 1956 रोजी केशवराव जेधे यांच्या अध्यक्षतेखाली पुण्याच्या टिळक स्मारक मंदीरात सभा झाली.त्यामध्ये 11 बिगर कॉंग्रेस पक्ष सामील झाले.
- सर्वानी एकमताने संयुक्त महाराष्ट्र समिती स्थापन केली.

- शंकरराव देव यांचा उपोषणाचा मार्ग इतरांना मंजूर न झाल्याने शंकररावांनी 10 फेब्रुवारी रोजी अध्यक्ष या नात्याने महाराष्ट्र एकीकरण परिषद बरखास्त केली.
- संयुक्त महाराष्ट्र समितीने श्रीपाद अमृत डांगे यांच्या अध्यक्षतेखाली कार्यकारिणी जाहीर केली.

**<u>मराठी वृत्तपत्रे आणि शाहिरांची कामगिरी :</u>**

| | |
|---|---|
| दै.मराठा : | आचार्य अत्रे |
| प्रबोधन : | केशव सीताराम ठाकरे |
| सकाळ : | नानासाहेब परुळेकर |
| नवाकाळ: | नीळकंठ खाडिलकर |

- अण्णाभाऊ साठे यांनी लिहिलेली छक्कड (लावणीचा प्रकार) संयुक्त महाराष्ट्र आंदोलनाचे प्रेरणागीत ठरले. (माझी मैना गावावर राहिली.....) शाहीर अमर शेख यांनी ती गायिली.

- **<u>मुंबई, विदर्भ, मराठवाडा, बेळगाव, कारवार, निपाणीसह संयुक्त महाराष्ट्र झालाच पाहिजे</u>** अशी संयुक्त महाराष्ट्र समितीची घोषणा होती.

**<u>डॉ.आंबेडकरांची भूमिका :</u>**

- भाषावार प्रांतरचना करण्यास डॉ.बाबासाहेब आंबेडकर फारसे उत्सुक नव्हते.
- भाषावार प्रांतरचनेमुळे ऐक्यभावना वाढीस लागण्याऐवजी हिंदुस्थानचे अधिक तुकडे पडतील, असे बाबासाहेबांना वाटत होते.
- भाषावार प्रांतरचना करावयाची झाल्यास संयुक्त महाराष्ट्रात उपप्रांत निर्माण न करता एक भाषा एकच प्रांत करावा असे त्यांचे म्हणणे होते.
- मुंबईचा समावेश संयुक्त महाराष्ट्रातच व्हावा.

- दार आयोगासमोर सादर केलेल्या निवेदनात त्यांनी ही भूमिका मांडली होती.

## द्विभाषिक राज्याचा प्रयोग (1956 ते 1960) :

- 7 ऑगस्ट 1956 रोजी संसदेने महाद्विभाषिक राज्याचा कायदा पास केला.
- मराठी व गुजराती भाषिक लोकांना एकत्र केलेल्या या राज्याचा पश्चिम महाराष्ट्रातील मुंबईसह 10 जिल्हे, विदर्भाचे 8, मराठवाडयाचे 5, गुजरात सौराष्ट्राचे 16 जिल्हे समाविष्ट केले.
- मोरारजींनी या राज्याचे स्वागत केले.
- महाराष्ट्र कॉंग्रेसने यशवंतराव चव्हाण यांची उमेदवारी निश्चित केली.
- 1 नोव्हेंबर 1956 रोजी सर्वात मोठया राज्याचे वयाने लहान असलेल्या यशवंतराव चव्हाण यांनी मुख्यमंत्रीपद स्वीकारले.
- संयुक्त महाराष्ट्रसमितीचे अत्रे, कोठारी, माधवराव बागल यांनी मात्र यशवंतराव चव्हाणांवर टीका करण्यास सुरुवात केली.
- हा निर्णय गुजराती भाषिकांनाही मान्य नव्हता. त्यांनी पं.नेहरुंकडे महागुजरात ची मागणी केली.

## 1957 ची सार्वत्रिक निवडणूक :

- लोकसभा, विधानसभा व मुंबई महानगरपालिका निवडणूका झाल्या.
- यामध्ये संयुक्त महाराष्ट्रसमितीला मोठे यश मिळाले. प.महाराष्ट्रात कॉंग्रेसला जबर धक्का.
- यशवंतराव चव्हाणही अगदी अल्पमताने निवडून आले.
- कॉंग्रेसची सत्ता टिकली, मात्र समितीने त्यांना जबर धक्का दिल्यामुळे कॉंग्रेस नेते जमीनीवर आले.

- मुंबई मनपा मध्ये समितीने 71 जागा जिंकल्या
- या निकालावरुन हे स्पष्ट झाले की, मतदार द्विभाषिक राज्याच्या विरोधात आणि संयुक्त महाराष्ट्राच्या बाजूचे आहेत.

**<u>शिव छत्रपती पुतळा अनावरण व प्रतापगडचा मोर्चा :</u>**

- 30 नोव्हेबर 1957 रोजी पंतप्रधान पं.नेहरु यांच्या हस्ते प्रतापगडावरील शिवाजी महाराजांच्या पुतळयाचे उदघाटन झाले.
- यावेळी संयुक्त महाराष्ट्र समितीने माधवराव बागल यांच्या नतृत्वाखाली प्रतापगडावर प्रचंड मोर्चा काढला. पसरणी घाट व पोलादपूर जवळ तीव्र निदर्शने करण्यात आली.
- नेहरुंना मराठी भाषिकांच्या भावनांची व एकूण परिस्थितीची जाणीव करुन देण्यात समिती यशस्वी झाली.
- त्यानंतरही समितीने आपले आंदोलन सुरुच ठेवले.
- 18 जाने 1959 पासून सीमा लढा समितीने करबंदी चळवळ सुरु केली.
- नोव्हे 1959 मध्ये आदिवासींनी मोरारजी विरोधात मोर्चा काढला.

## <u>1960 महाराष्ट्र निर्मितीच्या हालचाली</u>

- पं.नेहरुंना मराठी भषिकांच्या भावना समजल्यानंतर या विषयावर गंभीरपणे हालचाली सुरु झाल्या.
- मुंबई येथे झालेल्या कॉंग्रेस अधिवेशनात अध्यक्षस्थानावरुन बोलताना इंदिरा गांधी यांनी महाराष्ट्र निर्मितीचे आश्वासन दिले.
- चंदीगड अधिवेशनात गोविंद वल्लभ पंत, यशवंतराव चव्हाण, स.का.पाटील व जीवराज मेहता यांची समिती नेमली. या समितीने महाराष्ट्रनिर्मितीला अनूकूल अहवाल दिला.
- समितीच्या आग्रहावरुन मुंबई ऐवजी महाराष्ट्र असे नाव मान्य झाले.

- एप्रिल 1960 मध्ये संसदेने मुंबई पुनर्रचना कायदा मंजूर केला आणि 1 मे 1960 रोजी महाराष्ट्राची निर्मिती झाली.

## महाराष्ट्र राज्याची स्थापना :

- 1 मे 1960 रोजी महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाली.
- महाराष्ट्र व  गुजरात असे दोन भाग करण्यात आले.
- बनातवाडा, मेहसाना, सांबरकाठा, अहमदाबाद, कैरा, पंचमहाल, बडोदा, भडोच, सुरत, डांग, अमरेली, सुरेन्द्रनगर, राजकोट,जामनगर, जुनागड, भावनगर व कच्छ हे जिल्हे गुजरातमध्ये.
- ठाणे जिल्हयातील उंबरगाव तालुक्यातील खेडी, प.खानदेशातील नंदूरबार व नवापूर तालुक्यातील खेडी तसेच प.खानदेश जिल्हयातील अक्कलकुवा व तळोदे तालुक्यातील खेडी हा प्रदेश मुंबई राज्याचा भाग असणार नाही.
- केंद्र सरकारने रंगाचारी  यांच्या तोडग्यानुसार महाराष्ट्र व गुजरात या दोन्ही राज्यांना तूट भरुन काढण्यासाठी  प्रत्येकी 50 कोटी रुपये दयावेत.

- 1 मे 1960 रोजी  26 जिल्हे असलेल्या महाराष्ट्र राज्याची स्थापना झाली.
- महाराष्ट्र राज्याचा मंगल कलश यशवंतराव चव्हाण यांच्या हस्ते आणण्यात आला.
- मुंबईच्या शिवाजी पार्कवर पं.नेहरुंच्या हस्ते 1 मे 1960 रोजी कामगार दिनी  महाराष्ट्र राज्याची घोषणा करण्यात आली.
- महाराष्ट्राचे पहिले मुख्यमंत्री म्हणून त्यापूर्वीच्या द्विभाषिक मुंबई राज्याचे मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण यांनी जबाबदारी स्वीकारली.

# मराठवाडा मुक्तीसंग्राम

## *मराठवाडा : निजामकाळ*

- ओरंगेजबचा 20 फेब्रुवारी 1707 रोजी अहमदनगर येथे मृत्यू. त्याच्या मृत्यूनंतर 1682 ते 1707 असा सुरु असलेला मोगल मराठा संघर्षाचा शेवट.
- त्यानंतर मोगलांचे साम्राज्य दुबळे बनले.मोगलांचे शत्रू असलेल्या मराठे, जाट, राजपूत, शीख, यांनी आपापल्या प्रदेशावर अधिकार प्रस्थापित केले.
- मोगलांच्या महत्वाकांक्षी व स्वार्थी सरदारांनी अवध, रोहिलखंड व हैद्राबाद अशी स्वतंत्र राज्ये निर्माण केली.
- हैद्राबादच्या स्वतंत्र राज्याचा संस्थापक मीर कमरुददीन निजाम-उल-मुल्क होय.
- पहिल्या निजामाची कारकीर्द 1724 ते 1748 अशी 24 वर्षे राहिली.त्यानंतर निजामाच्या वारसदारांमध्ये 1748 ते 1762 पर्यंत वारसायुध्द घडून आले.
- निजाम उल मुल्क नंतर त्याचा मुलगा निजाम अली हा हैद्राबाद संस्थानचा राजा झाला.
- त्याने स्वत:ला निजाम अशी पदवी धारण केली.म्हणून नंतरच्या सर्व राजांना निजाम असे संबोधण्यात येते.
- निजाम-उल-मुल्क ला मोगल सम्राटाकडून आसफजहा असा किताब मिळाला होता.म्हणून या घराण्याचा उल्लेख आसफजाही घराणे असा करण्यात येतो.
- आसफजाही घराण्यात एकूण सात राजे होऊन गेले. त्यांचा एकूण कालखंड 224 वर्षांचा होता.
- शेवटचा निजाम मीर-उस्मान-अली (1911 ते 1948) याच्या काळात मराठवाडा मुक्तीसंग्राम घडून आला.

## मीर उस्मान अली ची कारकीर्द :

- पहिल्या महायुध्दात निजामाने इंग्रजांना पैसा, सैन्य, वस्तू यांची भरपूर मदत केली. युध्दातील मदतीचे बक्षीस म्हणून ब्रिटीश सम्राट पाचवा जॉर्ज याने निजामाला हिज एक्झाल्टेड हायनेस असा किताब दिला होता.
- महत्वाकांक्षी निजामाने स्वतंत्र इस्लामी राज्य स्थापन करण्याचे स्वप्न पाहिले होते.
- हैद्राबाद राज्यात राजभाषा फारशी होती.
- 1917 मध्ये हैद्राबाद ला उस्मानिया विदयापीठ स्थापन झाले.
- 1927 साली औरंगाबादला इंटरमिजिएट कॉलेज स्थापन झाले.
- हैद्राबाद राज्यात 11 टक्के मुसलमान होते, परंतु नोक-यांमध्ये त्यांचे प्रमाण 75 टक्के एवढे होते. यावरुन शासनाचे पक्षपाती धोरण लक्षात येते.

## सामाजिक व साहित्यविषयक जागृती :

- 1914-15 मध्ये हैद्राबादमध्ये दक्षिण साहित्य संघ स्थापन झाला. या कामात केशवराव कोरटकर व वामनराव नाईक यांनी पुढाकार घेतला. या साहित्य संघात अनेक मराठी तरुणांनी सहभाग घेतला.
- 1931 मध्ये हैद्राबादेत महाराष्ट्र साहित्य संमेलन घेण्यात आले.डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर हे अध्यक्ष होते.
- आ.कृ.वाघमारे यांनी संजीवनी साप्ताहिकात मराठी भाषेच्या विकासाबददल चिंता व्यक्त केली होती.
- 1920 मध्ये लक्ष्मणराव फाटक यांनी निजाम विजय हे वृत्तपत्र हैद्राबादेतून सुरु केले.
- आ.कृ.वाघमारे यांनी 10 फेब्रुवारी 1937 रोजी मराठवाडा साप्ताहिकाची स्थापना केली.
- 1937 मध्ये निजाम प्रांतीय मराठी साहित्य परिषद स्थापन झाली. तिचे पहिले अधिवेशन ऑक्टोबर 1937 मध्ये दादासाहेब खापर्डे यांच्या अध्यक्षतेखाली हैद्राबाद येथे झाले.दुसरे अधिवेशन नांदेड येथे सप्टे 1973 मध्ये दत्तो वामन पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली झाले.

- 1944 मध्ये तिसरे अधिवेशन औरंगाबाद येथे ग.त्रं.माडखोलकर यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न.

## <u>हैद्राबाद स्टेट कॉंग्रेस ची स्थापना :</u>

- 1938 नंतर संस्थानमधील परिस्थिती बदलू लागली. आंध्र महासभा, कर्नाटक परिषद आणि महाराष्ट्र परिषद या तिन्ही भाषिक प्रदेशात संघटना स्थापन होऊन लोकजागृतीचे प्रयत्न सुरु झाले.
- याच काळात हैद्राबाद शहरात कॉंग्रेस कमिटी स्थापन करण्यात आली.मात्र गस्ती निशाण 53 अन्वये नागरी स्वातंत्र्याचा संकोच करण्यात आला होता.
- धूळपेठ दंगलीनंतर वातावरण तापले. शासन व पोलीस पक्षपातीपणे वागले.
- धूळपेठ दंगलीचे पडसाद मराठवाडा व कर्नाटकमध्ये उमटले.
- निजामाने महाराष्ट्र परिषदेस जातीयवादी ठरवले.
- हैद्राबादमध्ये बाहेरुन येणा-या 21 वृत्तपत्रांवर बंदी घालण्यात आली.
- स्वामी रामानंद तीर्थ हे 1938 मध्ये अंबाजोगाई सोडून महाराष्ट्र परिषदेची संघटना बळकट करण्यासाठी हैद्राबाद येथे वास्तव्यास गेले.
- अशांत परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर 29 जून 1938 रोजी हैद्राबाद संस्थानात स्टेट कॉंग्रेस स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला.
- प्रारंभापासूनच निजाम सरकारच्या मनात स्टेट कॉंग्रेसमधील कॉंग्रेस हे शब्द खटकत होते. तसेच निजाम रामानंद तीर्थ, गोविंदभाई श्रॉफ यांना दहशतवादी मानत.
- स्टेट कॉंग्रेस ही विध्वंसक संघटना आहे, असे मानून सरकारने स्टेट कॉंग्रेसवर 7 सप्टेबर 1938 रोजी बंदी घातली.
- स्टेट कॉंग्रेसच्या लोकांनी कायदेभंग चळवळ करण्यास सुरुवात केली.
- स्वामी रामानंदतीर्थ यांना 1938 मध्ये सत्याग्रह केल्याबददल दीड वर्षे सक्तमजुरीची शिक्षा ठोठावण्यात आली.

- स्टेट कॉंग्रेसध्ये असलेल्या जहाल आणि मवाळ या गटांपैकी  स्वामी रामानंद तीर्थ जहाल गटाचे होते.
- संघर्ष करा नाही तर खुर्च्या खाली करा असा जहालांचा अग्रगह  होता.
- सत्याग्रहीचे गोविंदभाई श्रॉफ, माणिकचंद पहाडे यांनी कुशलपणे संघटन केले. त्यांच्याबरोबर  बाबासाहेब परांजपे, पुरुषोत्तम चपळगावकर, कर्वे, यांनी मोलाचे योगदान दिले.
- स्टेट कॉंग्रेस व जातीयवादी संघटना यांच्या सत्याग्रहांमध्ये गल्लत होऊन  स्टैट कॉंग्रेसबददल गैरसमज वाढू लागले.म्हणून म.गांधीजीच्या आदेशावरुन स्टेट कॉंग्रेसचा सत्याग्रह स्थगित करण्यात  आला.

**<u>हिंदू महासभेचा सहभाग</u>**

- सेनापती बापटांनी नामपल्ली येथे जाऊन सत्याग्रह करण्याची घोषणा केली. मात्र सेनापती बापटांना  नामपल्ली  स्टेशनवर अटक करुन  पुण्यास पाठवण्यात  आले.
- पुण्यास हिंदू प्रतिकार मंडळ व भागानगर नि:शस्त्र प्रतिकार मंडळ  स्थापन करुन स्वा. सावरकर व सेनापती बापट यांनी शनिवारवाडयावर सभा घेतली.
- हिंदू महासभा नि:शस्त्र प्रतिकार करण्याच्या लढयात पुढे आली.
- हिंदू महासभेच्या सहा तुकडया कायदेभंग करुन  तुरुंगात गेल्या
- वीर वामनराव जोशी यांनीही सत्याग्रह  कायदेभंग आंदोलनात आपला सहभाग नोंदविला.

**<u>आर्य समाजाचे कार्य :</u>**

- आर्य समाजाने  24 ऑक्टो 1938 पासून पुढे   जवळपास दहा महिने सत्याग्रहाचा लढा चालविला.
- हिंदू संघटन करणा-या आर्य समाजावर निजामाचा रोष होता.
- आर्य समाजाने शुध्दीकरण मोहिमही सुरु केली.
- आर्य समाजाने  सक्तीच्या धर्मांतरास विरोध केला.

- आर्य समाजाच्या अनुयायांवर मराठवाडयात अन्याय सुरु झाले.
- गुंजोटी येथील तरुण कार्यकर्ता वेदप्रकाश याची क्रूर हत्या झाली.हा हैद्राबाद संस्थानातील पहिला हुतात्मा.
- उदगीरच्या भाई शामलाल यांची बिदरच्या तुरुंगात हत्या करण्यात आली.
- निजामाच्या अत्याचारामुळे आर्य समाजाची लोकप्रियता वाढू लागली.
- संस्थानात आर्य समाजाच्या वतीने 31 जाने 1939 रोजी पहिला सत्याग्रह झाला.
- नंतर सर्व जिल्ह्यांत सत्याग्रह झाले.

**आंबेडकरांचे विचार :**

- डॉ.आंबेडकर यांचे हैद्राबाद मुक्ती संग्रामाबाबत अगदी स्पष्ट विचार होते. संस्थानातील जनतेला त्यांनी आवाहन केले होते की, त्यांनी भारतीय संघराज्यात सामील व्हावे.हैद्राबाद संस्थान स्वतंत्र म्हणजे भारताच्या विभाजनाची सुरुवात ठरेल असे त्यांचे मत होते.

**वंदे मातरम विदयार्थी चळवळ :**

- हैद्राबाद संस्थानात शिक्षण संस्थांमध्ये वंदे मातरम म्हणण्यास बंदी होती.
- 1938 हे प्रतिकाराचे वर्ष होते. औरंगाबाद कॉलेजमधील विदयार्थी बेचैन होते. गोविंदभाई श्रॉफ विदयार्थ्यांना चिथावणी देतात म्हणून त्यांना नोकरीतून काढून टाकण्यात आले.
- 14 नोव्हेंबर 1938 रोजी विदयार्थ्यांनी वसतिगृहात वंदे मातरम म्हणण्यास सुरुवात केली.
- सरकारने बंदी आणूनही विदयार्थी ऐकण्यास तयार नव्हते.
- 16 नोव्हेंबर ला विदयार्थ्यानी अन्नत्याग सत्याग्रह केला.
- 20 नोव्हेंबर रोजी विदयार्थ्यांनी संप पुकारला.
- या घटनेच पडसाद हैद्राबादमध्येही उमटले.
- विदयार्थ्यांना गणवेश सक्ती करण्यात आली. त्यास विदयार्थ्यांनी विरोध केला.
- वंदे मातरम प्रश्नावर 1200 विदयार्थी संपावर गेले. अनेकांना कॉलेजमधून काढून टाकले गेले.

- पुढे ही चळवळ व्यापक बनली. 1938 ते 1948 या काळात हैद्राबाद मुक्तीसंग्रामातील बहुतेक आघाडयांवर वंदेमातरम चळवळीतील कार्यकर्ते होते.

**<u>गुप्त आंदोलनांचे पर्व :</u>**

- संस्थानात स्टेट कॉंग्रेसवर बंदी चालूच होती.  स्टेट कॉंग्रेस चे नाव बदलले तर बंदी उठवू असे निजाम सरकारचे म्हणणे होते.
- जहालांनी म.गांधींकडे आंदोलनाची मागणी केली. म.गांधींनी वैयक्तिक सत्याग्रहाला मान्यता दिली.
- म.गांधींनी स्वत: पाच नेत्यांची निवड केली.

1) स्वामी रामानंद तीर्थ
2) हिरालाल कोटेचा (बीड),
3) देवरामजी चव्हाण (उस्मानाबाद),
4) अच्युतभाई देशपांडे (औरंगाबाद),
5) मोतीलाल मंत्री (बीड)

- 1943 पासून जहाल गट महाराष्ट्र परिषदेत प्रभावी बनला.

**<u>लोकसहभाग आणि सशस्त्र आंदोलन :</u>**

- 3 जुलै 1946 रोजी स्टेट कॉंग्रेसवरील बंदी उठवण्यात आली.
- अखिल भारतीय कॉंग्रेसच्या अधिवेशनांमध्ये हैद्राबाद संस्थानातील प्रश्नाबाबत सविस्तर चर्चा होऊ लागली होती.
- 1946 ते 1948 च्या कालखंडात हैद्राबादचा लढा अधिक तीव्र बनत गेला.
- 1946 च्या  अखेरीस  परभणी येथे महाराष्ट्र परिषदेच्या स्थायी समितीची बैठक होऊन त्यात महाराष्ट्र परिषदेचे स्टेट कॉंग्रेसमध्ये विलीनीकरण करण्याचा निर्णय घेण्यात आला.

- संस्थानात रझाकार संघटनांची वाढ कासीम रिझवी हा इत्तेहादूल मुसलमीन या संघटनेचा अध्यक्ष झाल्यानंतर झाली.
- रझाकार ही निमलष्करी संघटना होती.या संघटनेस निजामाकडून सहाय्य मिळत होते.
- कासीम रिझवी सोबतच संस्थानात अतिरेक्यांचे गटही उदयास आले.
- कासीम रिझवी ने रझाकारांचा वापर करुन संस्थानात दहशत व हूकूमशाही वातावरण तयार केले होते.
- संस्थानातील प्रजा व रझाकार यांच्यात सातत्याने संघर्ष होत असत.त्यातूनच अर्जापूर (जि. नांदेड) गावाजवळ गोविंदराव पानसरे यांचा 21 ऑक्टोबर 1946 रोजी रझाकाराने खून केला. पानसरे हे संस्थानातील स्टेट कॉंग्रेसचे पहिले हुतात्मा ठरले. त्यांच्यासोबतच आणखी 4 जण प्राणाला मुकले.

- स्टेट कॉंग्रेसवरील बंदी उठल्यानंतर हैद्राबाद संस्थानातील जहाल आणि मवाळ गटातील संघर्ष वाढत गेला. बिदर येथे 1 जाने 1947 रोजी झालेली स्टेट कॉंग्रेसची बैठक गाजली. मवाळ व जहाल नेत्यांनी एकमेकांवर आरोप प्रत्यारोप केले. पुन्हा नवीन स्थायी समिती अस्तित्वात आली. तिच्या अध्यक्षपदी स्वामी रामानंद तीर्थ यांचीच निवड झाली.

- जून 1947 मध्ये हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसचे पहिले अधिवेशन हैद्राबाद व सिकंदराबाद या शहरांमध्ये असलेल्य मुशिराबाद या भागात झाले.
- हैद्राबादचे गृहमंत्री अलियावर जंग यांनी स्वामीजींना सरकारच्या विरोधात न बोलण्यासंबंधी बजावले. संस्थानबाहेरुन आलेल्यांनी भाषणे करु नये, असेही बजावले. मात्र स्वामीजींनी त्यास न घाबरता अधिवेशनामध्ये सडेतोड भाषण करुन भारतीय संघराज्यात हैद्राबाद राज्य विलीन झालेच पाहिजे असा आग्रह धरला.

- कासीम रिझवी च्या नेृत्वाखाली तयार झालेल्या रझाकारांच्या सशस्त्र संघटनेला उत्तर देण्यासाठी स्टेट कॉंग्रेसनेही ठरवले की, संस्थानला लागून स्टेट कॉंग्रेसच्या सशस्त्र

लढयाची कार्यालये सुरु करायची. रझाकारांचा प्रतिकार करण्यासाठी निवडक लोकांना शस्त्रास्त्रांचे प्रशिक्षण देण्यात आले.

- या सर्व आंदोलनाचे मार्गदर्शक दिगंबरराव बिंदू यांच्या अध्यक्षतेखाली एक कृती समिती स्थापन करण्यात आली. स्वामीजींना अटक झाल्यास चळवळ चालवण्याचे सर्वाधिकार या कृती समितीला होते.

**<u>मुक्तिसंग्रामाचा प्रत्यक्ष प्रारंभ '</u>**

- स्टेट कॉंग्रेसच्या कार्यकारिणीची बैठक जुलै 1947 मध्ये हैद्राबाद येथे झाली. या बैठकीत लोकांना पुढील दोन महिन्यांसाठी प्रत्यक्ष लढयात भाग घेण्याचे आवाहन करण्यात आले. त्यात प्रामुख्याने दोन दिन पाळण्याचे आदेश देण्यात आले.

1) 7 ऑगस्ट ला संघराज्यात सामील होण्याचा दिवस साजरा करणे
2) 15 ऑगस्टला भारताच्या स्वातंत्र्याचा दिवस साजरा करणे.

अर्थात हे दिन साजरे करणे म्हणजे कायदेभंग करुन तुरुंगात जाणे असाच अर्थ होता.

- 7 ऑगस्ट हा दिवस मराठवाडयातील सर्व तालुक्यांत संघराज्यात सामील होण्याचा दिन म्हणून साजरा करण्यात आला. सरकारने दडपशाही केली. अनेक कार्यकर्ते तुरुंगात.
- 7 ऑगस्ट दिनाचा अनुभव लक्षात घेऊन निजाम सरकारने 13 ऑगस्ट 1947 पूर्वीच एक फर्मान काढले की, कोणत्याही परराष्ट्राचा ध्वज सार्वजनिक सभेत फडकावता येणार नाही. हूकूम मोडणा-यास 3 वर्षे तुरुंगवास अथवा मृत्यूदंड होईल.
- मात्र स्वामीजींनी फर्मानाची पर्वा न करता ध्वज फडकावण्याचा निर्धार केला.
- 15 ऑगस्ट रोजी स्वामीजी, कृष्णाचार्य जोशी, डॉ.जी.एस.मेलकोटे यांच्या सोबत सुलतान बाजारात खांदयावर ध्वज घेऊन गेले असता त्यांना पकडून चंचलगुडा जेलमध्ये टाकण्यात आले.
- यावेळी हैद्राबाद शहरात आठ हजार विदयार्थ्यांनी जमावबंदीचा भंग करुन खांदयावर झेंडा घेऊन मिरवणूक काढली.

- घराघरावर तिरंगा फडकला.

- 29 नोव्हेंबर 1947 रोजी सरदार पटेलांनी घटना समितीमध्ये जैसे थे करार सादर केला. हैद्राबाद संस्थान आणि इंग्रज यांच्यात पूर्वी जसे संबंध होते, तसेच संबंध स्वातंत्र्यानंतर भारत सरकार व निजाम सरकारचे राहतील असा या कराराचा अर्थ होता. मात्र निजामाने कराराचे गांभीर्य मुळीच पाळले नाही.

## कृती समितीचा क्रांतीकारी कार्यक्रम

- 1 ते 30 सप्टेबर 1947 च्या दरम्यान सर्वत्र झेंडावंदनाचे कार्यक्रम हाती घेण्यात आले.2 ऑक्टो ते 30 नोव्हेंबर पर्यंत सरकारी यंत्रणा बंद पाडण्याचे तंत्र वापरण्यात आले.
- रेल्वे रुळ उखडणे, तारा तोडणे, यासारखे कार्यक्रम हाती घेण्यात आले.
- सर्व जिल्हयांत जंगल सत्याग्रह राबविण्यात आला.
- स्वामीजी 26 जानेवारी ते 17 सप्टेबर 1948 पर्यंत जेलमध्ये होते.यादरम्यानच लढयाचे रुपांतर तीव्र आंदोलनात झाले होते.
- जागोजागी होणारे सशस्त्र लढे आणि नांदेड जिल्हयातील उमरी बॅंक प्रकरण यात स्वामीजींना खूप मनस्ताप झाला. तरीही स्वामीजी कृती समितीच्या पाठीशी राहिले.
- संस्थानातील सर्व जिल्ह्यांत व्यापक स्वरुपाचा लढा दिला गेला म्हणून निजामी सत्तेची पाळेमुळे पोखरली गेली व पोलीस ॲक्शनच्या वेळी निजामी सत्तेला पाच दिवसांत शरणागती पत्करावी लागली.

## 1948 मधील पोलीस ॲक्शन (ऑपरेशन पोलो)

- जैसे थे कराराचा निजामाकडून गैरवापर करणे, अनेक तरतूदींचा भंग करणे असे उदयोग पंतप्रधान मिर लायक अलीच्या सरकारने सुरु केले.

- कासीम रिझवी ने रझाकारांची संख्या व बळ वापरुन सर्वत्र अत्याचाराचे एक नवे पर्व सुरु केले.
- रझाकारांनी सर्वत्र विध्वंस व प्रचंड रक्तपात सुरु केला. या सर्व अत्याचारांना निजामाची मूक संमती होती.
- यामुळे भारताच्या गव्हर्नर जनरल ने 31 ऑगस्ट 1948 रोजी निजामाला पत्र पाठवून निजामाने रझाकारी संघटनेवर बंदी घालावी अशी मागणी केली.
- मात्र निजामाने या पत्राचे बेजबाबदारपणे उत्तर दिले.त्यामुळे निजामाविरोधात बळाचा वापर करणे अपरिहार्य होते.
- वारंवार विनंत्या करुनही निजामाकडून भारत सरकारला सकारात्मक प्रतिसाद मिळाला नाही. उलट आपले संस्थान स्वतंत्रच रहावे म्हणून निजामाने संयुक्त राष्ट्र संघटनेकडेही धाव घ्यायला सुरुवात केली.
- आता मात्र भारताच्या मध्यातच एक स्वतंत्र देश तयार होण्याची भिती निर्माण होऊ लागल्याने गृहमंत्री वल्लभभाई पटेल यांनी अत्यंत गांभीर्याने विचार करुन निजामावर लष्करी कारवाई करुन ते संस्थान भारतीय संघराज्यात विलीन करण्याचा निर्णय घेतला.
- 7 सप्टेंबर 1948 रोजी भारत सरकारने सैन्यदलाला हैद्राबादवर चढाई करण्याचे आदेश दिले.
- त्यानुसार 13 सप्टेबर 1948 रोजी पहाटे 4 वाजता संस्थानविरोधात पोलीस ॲक्शन ची कारवाई झाली.

## <u>ऑपरेशन पोलो</u>

- 13 सप्टेबर रोजी भारतीय फौजा हैद्राबाद संस्थानात पाच वेगवेगळया ठिकाणांहून घुसल्या.
- ही कारवाई ऑपरेशन पोलो या सांकेतिक नावाने ओळखली जाते.
- ले.जन.राजेंद्रसिंह यांच्या मार्गदर्शनाखाली (त्यापूर्वी जनरल गोडार्ड) मे.जन जयंत चौधरी, मे.जन. डी.एस.ब्रार, मे.जन.ए.ए.रुद्र, ब्रिगेडियर शिवदत्तसिंह आणि ए✕र व्हाईसमार्शल मुखर्जी यांनी ही योजना पूर्णत्वास नेली.

- 17 सप्टेंबर पर्यंत पोलीस ॲक्शन सुरु राहिली.
- शेवटी 17 सप्टेबर रोजी हैद्राबाद च्या निजामाच्या फौजांनी लिंगमपल्लीपर्यंत माघार घेतली.
- 17 सप्टेबर ला सायंकाळी निजामाने आपली शरणागती पत्करली.
- 18 सप्टेंबर रोजी भारतीय सैन्याने निजामाची राजधानी हैद्राबाद शहरात प्रवेश केला. तेथे मेजर जनरल चौधरींनी निजामाचे सेनाप्रमुख अल इद्रिस यांच्याकडून शरणागती पत्करल्याचे पत्र घेतले.
- 17 सप्टेबर हाच मराठवाडा मुक्तिदिन म्हणून साजरा केला जातो.
- पुढे हैद्राबाद संस्थान भारतीय संघराज्यात विलीन करुन घेण्यात आले.
- फाजल अली समितीने हैद्राबाद राज्याचे विभाजन करण्याची शिफारस केली.
- स्वामी रामानंद तीर्थ हे भाषिक पुनर्रचनेच्या बाजूने होते. मराठवाडा महाराष्ट्रात सामील व्हावा, असा आग्रह त्यांनी शेवटपर्यंत लावून धरला.
- शेवटी त्यांचा विजय झाला व मराठवाडा महाराष्ट्रात सामील करण्यात आला. तेलुगु भाषिक भाग आंध्रप्रदेशात तर कन्नड भाषिक भाग कर्नाटकमध्ये विलीन करण्यात आला.

::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::::